गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक ६ वें.

# द्रोणसंकोप

अथवा

# मानभंग आणि सूड.



असाध्य वस्तूची नव्हे प्राप्ति ।
तरी कां धनुष्य धरावें हातीं ॥

—मुक्तेश्वर.



लेखक—'किरात.'

[ प्रथमावृत्ति ]



मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

मार्च १९०४.

# महाभारतप्रशंसा.

इतिहासोत्तमादस्मात् जायंते कविबुद्धयः

आदिपर्व, अध्याय २ रा, श्लोक ८५.

नाना कथारूपें भारती । प्रगटली असे त्रिजगती ।
आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥ ३२ ॥

ह्मणोनि हा काव्यां रावो । ग्रंथगुरुवतीचा ठावो ।
एथूनि रसां झाला भावो । रसाळपणाचा ॥ ३३ ॥

एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ३५ ॥

माधुर्यी मधुरता । शृंगारीं सुरेखता ।
रूढपण उचितां । दिसलें भलें ॥ ३६ ॥

भानुतेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें ॥
तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९ ॥

—ज्ञानेश्वर.

"जगांतील सर्व उत्कृष्ट वीररसप्रधान काव्यांमध्यें महाभारताची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे. * * महाभारताचा विषय मोठा संमिश्र आहे. नुसत्या 'महाभारत' या एका शब्दावरूनच विशालत्व व संमिश्रत्व यांची कल्पना मनांत उभी राहते. भारतांतील विषयांच्या अंगभूत गोष्टी व प्रसंग इतके अनेक व भिन्न आहेत कीं, अर्वाचीन सर्व कवींनीं कल्पिलेल्या उत्कृष्ट प्रसंगाचा उगम भारतांत सांपडेल. सौतीचे ह्मणण्याप्रमाणें सर्व अर्वाचीन कविपक्ष्यांचें महाभारतरूपी वटवृक्ष हें विश्रांतिस्थान आहे. किंवा ही काव्यस्फूर्तींची एक प्रचंड नदी असून तींतून वाटेल त्या कवीनें आपली तहान भागवून घ्यावी !

* * * *

पात्रस्वभाववैचित्र्य व त्यांचें यथावत् वर्णन हे शेक्सपिअरचे जसे गुण आहेत तसे ते भारतांतहि दृग्गोचर होतात. पण आश्चर्य हें कीं, शेक्सपिअरनें जीं भिन्न पात्रें अनेक नाटकांत आणलीं, तसलीं व्यासांनीं एकाच काव्यांत गोंवून दिलीं.

* * * *

इलियड हें जसें राष्ट्रीय काव्य आहे तसें महाभारतहि असून त्यांत आर्यांच्या पुराणकथा व प्राचीन इतिहास यांचें भांडार आहे.

* * * *

महाभारतांतील संभाषणें वीररसप्रधान काव्यास साजतील अशींच उत्तम आहेत. किंबहुना संभाषण हें महाभारताचें प्रधान व उत्कृष्ट अंग आहे. भारतांतील भाषणें जोराचीं, वक्तृत्वपूर्ण आणि त्या त्या पात्राचे स्वभावास साजतील अशींच आहेत. * * त्यामुळें महाभारतास नाटकाचेंच स्वरूप प्राप्त झालें आहे."

**चिं. वि. वैद्य.**

# प्रस्ताव.

नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ।

—कालिदास.

द्रौपदीसंकोप नाटक हें पौराणिक नाटक आहे. यास मूळ आधार महाभारताचा आहे. ह्या महाभारतावर आजपर्यंत अनेक स्वरूपांत महाकवींच्या उड्यांवर उड्या पडल्या, महाराष्ट्र काव्यांमध्यें ज्याच्या अनेक प्रतिकृति निर्माण झाल्या व विद्यमानकालींहि ज्याचीं महाराष्ट्र भाषेंत दोनतीन भाषांतरें अथवा रूपांतरें झालीं आहेत, इतकेंच नव्हे– पण प्रसिद्ध बाबू प्रतापचंद्रराय नामक वंगदेशीय विद्वानानें ज्याचें इंग्रजीमध्यें समग्र भाषांतर केलें आहे व रोमेशचंद्र दत्तासारख्या दुसऱ्या एका वंगदेशीय विद्वानानें ज्याला आंग्ल भाषेंत कविताबद्ध करून टाकिलें आहे त्या महाकाव्यांतून—त्या वीररसप्रधान राष्ट्रीय महाकाव्यांतून—एखादें सुंदर कथानक घेऊन त्यावर नाटक रचून त्यायोगें भिन्नभिन्न अभिरुचींच्या जनवृंदाचें समाराधन करून जमल्यास त्यांच्या अभिरुचीची दिशाहि थोडीशी बदलावी, अशा हेतूनें प्रकृत प्रयत्न केला आहे.

निरनिराळ्या भाषांतील वाङ्मयाची उत्पत्ति, अभिवृद्धि, त्याच्या स्वरूपांत झालेला फेरफार व त्याचा इतिहास याचें अवलोकन केलें असतां असें दिसून येतें कीं, प्रत्येक भाषेच्या वाङ्मयांत प्रथमतः काव्यग्रंथ निर्माण झाले आहेत. या काव्यांच्या श्रवणानें अथवा वाचनानें होणाऱ्या आल्हादाची सीमा होऊन एकाच प्रकारच्या रचनेची अति परिचयामुळें अवज्ञा होऊन, त्या रचनेमध्यें नवीननवीन स्वरूपांचा समावेश करावा व एकाच प्रकारच्या वाक्यरचनेस विटलेल्या आणि कंटाळलेल्या श्रोतृवृंदास अथवा वाचकवृंदास कांहीं निराळ्या प्रकारानें तोषवावें असें काव्यकारांस वाटून त्यांनीं नवीन दृश्यकाव्यें रचिलीं असावीं. हीं दृश्यकाव्यें ह्मणजे नाटकें होत. प्राचीन काळच्या ग्रीक व लॅटिन् भाषांप्रमाणेंच संस्कृत वाङ्मयांतहि असाच प्रकार झालेला आढळून येतो आणि संस्कृत भाषेपासून जन्म पावलेल्या सांप्रतच्या आपल्या महाराष्ट्र भाषेच्या वाङ्मयांतहि पुढें तोच प्रकार दिसून येतो.

संस्कृत वाङ्मयामध्यें सर्वांत श्रेष्ठकाव्यें ठरलीं ह्मणजे रामायण व महाभारत हीं होत. या दोन आदिकाव्यांपासूनच पुढील बहुतेक सर्व श्राव्य अथवा अदृश्य काव्यें (Poetry) व दृश्यकाव्यें (Dramas) निर्माण झालीं आहेत.

महाभारताच्या आधारें संस्कृतांत जे काव्यग्रंथ झाले आहेत त्यांत दृश्य काव्याचे ग्रंथ असे फारच थोडे आहेत. श्राव्य अथवा अदृश्य काव्यांचे ( Poetry ) मात्र पुष्कळ आहेत. भारतावरून रचिलेलीं नाटकें संस्कृत वाङ्मयांत फारच उपलब्ध आहेत. एक भट्ट नारायणाचें वेणीसंहार, दुसरें कालिदासाचें शाकुंतल, तिसरें राजशेखर कवीचें बालभारत व चवथें धनंजयविजय. बालभारताचेतर दोनच अंक उपलब्ध आहेत. अदृश्य काव्यग्रंथांकडे पाहिलें तर युधिष्ठिरविजय, नैषधकाव्य,

राघवपांडवीय, राघवयादवीय, चंपूभारत, माधवमंजरी, किरातार्जुनीय असे कित्येक नामांकित काव्यग्रंथ ठळकपणें दृष्टीस पडतात. वर दिलेल्या दृश्यकाव्यांच्या व अदृश्य काव्यांच्या संख्येकडे पहातां, अदृश्य काव्यांकडे कविवर्गाचा जितका ओढा होता तितका दृश्य काव्यांकडे नव्हता, असें स्पष्ट दिसतें; व याचें कारण नाटकप्रयोगास प्रतिकूल अशी तत्कालीन परिस्थिति असावी, अथवा कदाचित् नवीन काव्यप्रकारासंबधानें साशंक होऊन कविवर्गानें प्राचीनांची पद्धतीच अनुसरली असावी; अथवा प्राचीन कवींच्या कृतींच्या तोडीचीं काव्यें निर्माण करण्यांतच बुद्धीचें खरें कौशल्य व खरा श्रेष्ठपणा आहे असें त्यांस वाटत असावें, असें दिसतें आणि त्यामुळेंच त्या काळीं सुप्रसिद्ध नाटककार अवतीर्ण होणें अशक्य झालें असावें. अथवा यदाकदाचित् कांहीं नाटककारच असे झाले असल्यास ते वेळोवेळीं बदललेल्या राजकीय स्थित्यंतरांच्या भयंकर आघातांमुळें कालाच्या विस्तृत व भेसुर जबड्यांत गडप होऊन गेले असतील ! यासंबंधानें आज निश्चित असें कांहींच अनुमान करितां येत नाहीं.

संस्कृत वाङ्मयांतील ज्या नाटकांस महाभारताचा आधार आहे त्यासंबंधानें हें झालें. रामायणाच्या व भागवताच्या आधारें झालेले नाटकग्रंथहि संस्कृतांत चारपांचच दिसतात. एकंदर उपलब्ध अशा संस्कृत नाटकांची संख्या पाहिली तर तीहि ३०।४० नाटकग्रंथांच्या पलीकडे जाणार नाहीं. पण यासंबंधानें येथें विचार कर्तव्य नाहीं. एकंदरींत दृश्य काव्यांकडे कवींचा ओढा कमी होता, हें दाखविण्याचाच आमचा आशय आहे.

हें संस्कृत वाङ्मयासंबंधानें झालें. आतां महाराष्ट्र वाङ्मयाकडे पहातां पन्नाससाठ वर्षांपूर्वीं त्यांत नाटकग्रंथ असा कोणीच लिहिलेला आढळून येत नाहीं. सर्व कवींचा भर केवळ अदृश्य काव्यग्रंथांवर होता, दृश्य काव्यग्रंथांवर नव्हता. आदिकवि मुकुंदराजापासून तों डफ हातांत घेऊन नाचणाऱ्या रामजोशी, अनंतफंदीपर्यंतच्या कविमंडळाकडे पाहिले तर ते सर्व साधुसंत होते असें आढळून येतें. परमेश्वरविषयक निस्सीम भक्तीनें ज्यांचीं अंतःकरणें उचंबळून जाऊन तेथूनच त्यांच्या काव्यमकरंदास भरतें येत असल्याचा प्रकार दिसतो. या पांचसहाशें वर्षांच्या काळांत जे हे संतकवी निर्माण झाले त्यांनीं जें महत्कार्य केलें तें राष्ट्राची नीति, धर्म व इतिकर्तव्यता हीं जागृत ठेवून त्यांतील व्यक्तिमात्रांच्या ठिकाणीं असणाऱ्या उच्च मनोवृत्ति उत्तम तऱ्हेनें पोसण्याचें होय. या कालाच्या उत्तरार्धांत महाभारत व रामायण यांसारख्या वीररसप्रधान राष्ट्रीयकाव्यांनां महाराष्ट्र भाषेंत आणून सोडणारें कविमंडळ निपजलें व हा काळहि असाच होता कीं, ज्या वेळीं अशाच ग्रंथांचे पाठ देणारे राष्ट्रीय शिक्षक पाहिजे होते. भारतीय वीरांच्या ठिकाणीं असणारे शौर्य, साहस, पराक्रम, धैर्य, सत्यैकनिष्ठता, धर्मनिष्ठा व कर्तव्यदक्षता इत्यादि गुण व इतर उच्च मनोवृत्ति यांचा आपल्या जिवंत वाणीनें पुनश्च प्रादुर्भाव करणारे महापुरुष या काळीं पाहिजे होते व ते तसे निर्माणहि झाले; आणि त्यांनीं जें कार्य करावयाचें तें केलेंहि.

महाराष्ट्र भाषेंत दृश्यकाव्यें रचणारे कवि निपजण्याचा काळ यापुढें यावयाचा होता. हिंदु साम्राज्याची घडी बरोबर बसून सर्वत्र शांतता नांदूं लागली असती म्हणजे अर्थात् लोकांच्या मनोरंजनाचीं साधनेंहि निघालीं असतीं व आपोआपच महाराष्ट्रांत नाटक-

कारहि अवतीर्ण झाले असते. पण दुर्दैवानें तसा सुयोगच जमून आला नाहीं. एकोणिसाव्या शतकाचे पूर्वार्धात भयंकर राज्यक्रान्ति होऊन महाराष्ट्रांत इंग्रजी अमदानीस सुरवात झाली. येथील राजेरजवाड्यांवर इंग्रजी साम्राज्याचें छत्र उभारलें गेलें, आणि मग अर्थातच त्यांस युद्धप्रसंगासारख्या खटाटोपांत पडण्याचें कारणच उरलें नाहीं! नवीन दिशेनें शिक्षण देण्याची दिशा ठरून हांहां म्हणतां विद्याप्रसार सुरू झाला व सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें. ह्या साम्राज्याचा व शांततेचा महाराष्ट्रास लाभ होण्यापूर्वी तो कर्नाटकास झाला होता व तिकडे संस्कृत नाटकांचे प्रयोग जे क्वचित् यात्रेच्या प्रसंगीं करण्यांत येत त्यांच्या अनुकरणाने ललितांचे व दशावतारी खेळांचे प्रघात सुरू झाले होते. महाराष्ट्रांत शांततेचें साम्राज्य पसरून तेथील राजेरजवाड्यांच्या दृष्टीस वरील प्रकार पडतांच दुसरें कांहीं कर्तव्य उरलें नसल्यामुळें महाराष्ट्रांतहि ललितांची व दशावतारी खेळांची अस्सलबरहुकूम नक्कल सुरू झाली! या नक्कलेंतच महाराष्ट्रीय नाटकांचें आद्य स्वरूप दृग्गोचर होतें. कोणत्याहि देशाच्या नाट्येतिहासाकडे पाहिलें तरी असेंच आढळून येईल कीं, नाटकप्रयोगाकरितां प्रथमतः जे विषय निवडले जावयाचे ते दैविक अथवा ईश्वरविषयकच असावयाचे. आणि महाराष्ट्रांतहि प्रथमतः अशाच विषयांची निवड झाली. पुढें महाराष्ट्रांत होणाऱ्या ललितांचें व दशावतारी खेळांचें अव्यवस्थित व अनिश्चित स्वरूप बदलून नाटकांकरितां महाभारत, रामायण व भागवत यांतील पौराणिक कथाभागांची निवड होऊन पौराणिक नाटकांच्या प्रयोगास सुरुवात झाली.

द्रौपदीवस्त्रहरण, विराटपर्व, बाणासुरबकासुरादिवध, प्रमिलास्वयंवर, वत्सलाहरण, बभ्रुवाहननाटक, किरातार्जुनयुद्ध हे व अशा प्रकारचे अनेक कथाभाग निवडले जाऊन त्यांवर नाटकप्रयोग होऊं लागले. पण हीं नाटकें त्या वेळीं व्यवस्थित रीतीनें लिहिलेलीं नसत. त्याच वेळेस दामाजीपंताचा फार्स, नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूचा फार्स, अफझूलखानाचा फार्स, झांशीचीराणी, हीं नाटकेंहि पुढें आलीं. फार्स, प्रहसन व नाटक कशास म्हणावें याची त्या वेळीं असावी तशी जरी कल्पना नसली, तरी वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगांची झालेली निवड पहातां 'भक्तिरसपरिप्लुत' नाटकांचें व 'ऐतिहासिक' नाटकांचे मूळ स्वरूप त्यांत स्पष्टपणें दिसतें, ही गोष्ट विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. लोकोत्तर, असामान्य व आश्चर्यकारक आणि चमत्कृतिजनक गोष्टी व प्रसंग मनुष्यास थक्क करून सोडून त्यांच्या मनावर कसकशीं कार्यें करितात, याचें वर निर्दिष्ट केलेल्या विषयांच्या निवडींतच स्पष्टपणें प्रतिबिंब दिसून येतें. दामाजीपंताचें औदार्य, अफझूलखानाचा वध, नारायणराव पेशव्यांचा खून व झांशीच्या राणीची शेवटची धडपड, ह्या लौकर विसरून जाण्याइतक्या सामान्य व दैनंदिन व्यवहारांत नेहेमीं घडून येणाऱ्या गोष्टी नव्हत्या; आणि म्हणूनच त्या नाटकांस विषयीभूत झाल्या. आंग्लविद्येशीं केवळ अपरिचित असणाऱ्या नाटककारांकडून अशा रीतीनें वरील नाटकें पुढें येत होतीं त्याच सुमारास दुसरीकडे इंग्रजी विद्येच्या प्रसाराबरोबर संस्कृत विद्येचाहि प्रसार नवीन पद्धतीनें जोरानें होऊं लागून तत्कालीन सुशिक्षित लोकांच्या परिश्रमानें संस्कृत नाटकांचीं मराठींत भाषांतरें होऊन त्यांच्या प्रयोगांचाहि उपक्रम सुरू झाला. आंग्लविद्याविभूषितांनीं इंग्रजी नाटकांच्या भाषांतरांस सुरुवात करून कांहीं 'बुकिश' (गद्यात्मक)

खेळहि रंगभूमीवर आणिले, व त्यानंतर शेक्सपिअरसारख्या लोकमान्य आंग्ल महाकवींच्या नाटकग्रंथांचीं भाषांतरें होऊन त्यांचे प्रयोग होऊं लागले. याचकाळीं दुसरीकडून लोकाभिरुचीस निराळें वळण लागत चाललें. कांहीं नाटकें सामाजिक विषयावर होऊन त्यांचे प्रयोगहि लोकप्रिय होऊं लागले. पुढें हिंदुसाम्राज्याची महाराष्ट्रांत स्थापना करणारे व त्यांस साह्यभूत होणारे वीरपुरुष नाटकाचे विषय झाले. यापुढें वीररसप्रधान अशीं काल्पनिक ऐतिहासिक नाटकेंहि पुढें आलीं. एका बाजूनें हा प्रकार होत असतां दुसरीकडून संगीत नाटकांची जी एक भयंकर लाट उसळली त्या लाटेबरोबर पांचपन्नास संगीत नाटकें बाहेर आलीं! व 'हां हां मदंगा' आणि 'रंगीनें लाविला चुटका' यांसारखे धांगडधिंगे सुरू होऊन लोकाभिरुचीस चांगलें वळण लागण्याऐवजीं अत्यंत घातुक असें वळण लागलें. इकडे गद्यात्मक नाटकांची दिशा बदलून तुकाराम, रामदास, एकनाथ आदिकरून साधुसंतमंडळी सांप्रत नाटकाचे विषय होऊन बसले आहेत. हा प्रकार पाहून अशी भीति वाटते कीं, तेराव्या शतकांतील मुकुंदराज ज्ञानेश्वरापासून तों एकोणिसाव्या शतकाच्या आरंभींच्या डफवाल्या अनंतफंदीपर्यंत ही ऐतिहासिक (!.) व भक्तिरस परिप्लुत नाटकांची लाट जाऊन आदळते कीं काय! संगीत नाटकांचा जो सध्या प्रवाह वहात आहे त्यावरहि वरील लाटेचें थोडेंबहुत कार्य होईलसा रंग दिसतो. असो.

वर दिलेल्या त्रोटकशा महाराष्ट्र नाट्येतिहासावरून लोकाभिरुचीची कल्पना व समाजाच्या अंतःस्वरूपाचें आविष्करण हीं करण्यास पुष्कळ अवकाश सांपडेल, आणि त्याचप्रमाणें राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारासंबंधानें समाजाचा ओघ कोणत्या दिशेनें वहात आहे याचीहि सूक्ष्मरीतीनें अवलोकन केलें असतां बिंबप्रतिबिंबन्यायानें अंशतः अटकळ करितां येईल.

आमच्या समाजाच्या सध्याच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक स्थितीचा विचार करितां महाभारतासारख्या लोकमान्य ग्रंथाचा लोकसमूहास परिचय करून देण्याची आज अत्यंत आवश्यकता भासत आहे. महाभारत व रामायण यांसारख्या राष्ट्रीय महाकाव्यांतील पुरुषांसंबंधानें विद्यालयांतील व विश्वविद्यालयांतील विद्यार्थिवर्गाच्या ठिकाणीं आढळून येणारें अज्ञान व त्यांच्या पालकांच्या ठिकाणीं स्पष्टपणें दृगोचर होणारें ताटस्थ्य व औदासिन्य हीं अत्यंत शोचनीय होत. समाजांत रूढ असलेल्या कथापुराणांच्या लोकमान्य संस्थाहि हळूहळू लुप्तप्राय होत चाललेल्या आहेत; व कीर्तनप्रसंगीं हरिदासांनीं "टाळी महाराज" म्हटल्याबरोबर हरिनामाच्या गजराबरोबर होणारी संमिश्र श्रोतृवृंदाची पवित्र *पौर्वात्य टाळी जाऊन तिच्या ऐवजीं पाश्चिमात्य टारगट व छिचोर टाळी* पडूं लागली आहे! समाजाची ही स्थिति अत्यंत उद्वेगजनक व नैराश्य उत्पन्न करणारी आहे.

या सर्व गोष्टीकडे दृष्टी पोंचवूनच आम्हीं 'पौराणिक नाट्यकथामाले' चें हें प्रथम पुष्प' गुंफिलें आहे. नाट्याचा आश्रय करण्याचें कारण प्रस्तावनेच्या आरंभीं अवतरणांत जी महाकवि कालिदासाची उक्ति नमूद केली आहे तिच्यावरून उघडच होत आहे. कारण भिन्नभिन्न अभिरुचींच्या लोकांचें समाराधन करण्याचा सुलभ व उत्कृष्ट असा जो एकच मार्ग आहे तो नाट्याचाच होय. आणि एवढ्याचकरितां प्रकृत

लेखकानें याच मार्गाचा अवलंब केला आहे. केवळ लोकसमाराधन करावें हाच लेखकाचा हेतु नाहीं. प्रधान हेतु साधण्याचें हें एक द्वार आहे इतकेंच. आणि ह्मणूनच समाराधनेच्या सुगम द्वारानेंच त्याला महाभारतांतील भीष्म, द्रोण, विदुर, कुंती, कृपी, द्रौपदी, श्रीकृष्ण, धर्म, भीम, कर्ण, अर्जुन इत्यादि महाभागांच्या ठिकाणीं असणाऱ्या विलक्षण ओजाचे, अलौकिक आत्मयज्ञाचे अर्थात् स्वार्थत्यागाचे, औदार्याचे, जगन्मान्य अशा राजकीय व धार्मिक नीतीचे, विलक्षण शौर्याचे, सत्यैकनिष्ठतेचे व इतर उच्च व उज्वल मनोवृत्तींचे चित्रपट दाखवून 'हें चित्र पहा आणि तें चित्र पहा' ह्मणून सांगून, त्यांच्या ठिकाणीं विद्यमान कालाशीं झुंजायास आवश्यक अशा उच्च मनोवृत्तींची वाढ होण्यास अनुकूल अशा द्रव्याचे कण टाकावयाचे आहेत. इलियडमध्यें ग्रीशीअन लोकांत देशाभिमान जागृत करून वीरांच्या ठिकाणीं शौर्यस्फूर्ति उत्पन्न करण्याचें जसें एकदेशीय सामर्थ्य होतें तसें केवळ एकदेशीय सामर्थ्यच महाभारतांत नाहीं. भारताची सर्व इमारत धर्माच्या भक्कम पायावर उभारली असून मनुष्यमात्राच्या उच्चउच्च मनोवृत्ति उत्कृष्ट तऱ्हेनें पोसल्या जाव्या अशा तऱ्हेची त्याची रचना आहे. त्याच्या ठिकाणीं मोठमोठे साधुसंत, विरक्त पुरुष व कवी उत्पन्न करण्याचें जसें अद्भुत सामर्थ्य आहे. तसेंच कट्टे देशभक्त, धोरणी मुत्सद्दी, राजकुशल मंत्री व धर्म संरक्षणाकरितां राज्यस्थापनेसारखीं महत्कार्यें उरकण्यास योग्य असे वीर पुरुष, रणझुंजार योद्धे, करारी वीरमाता आणि पतिभक्तिपरायण वीरांगना उत्पन्न करण्याचेंहि लोकविलक्षण सामर्थ्य आहे. महाभारताच्या ह्या अलौकिक सामर्थ्यावरच सर्वस्वी भिस्त ठेवून प्रस्तुत लेखकानें निर्धास्तपणे त्यांतील उत्कृष्ट व मनोहर प्रसंग निवडून त्यांच्या द्वारें उद्दिष्ट कार्य उरकण्याचा प्रयत्न करण्याचें अंगीकारिलें आहे. या प्रयत्नानें लोकसमूहाची दृष्टि महाभारताकडे वळून त्याजकडे ते आवश्युक्त व प्रेमदृष्टीनें पाहूं लागले आहेत इतका जरी परिणाम झाला, तरी लेखकाचें अंशतः कार्य झालें, असें तो समजेल.

प्रस्तुत नाटकांत द्रोणाचार्यांचा द्रुपद राजाकडून अपमान व मानभंग होऊन त्याजबद्दल ते कसा सूड उगवित आहेत, या प्रसंगाचें चित्र रेखाटलें आहे. महाभारतांत प्रमुखत्वानें येणाऱ्या व्यक्ति झटल्या ह्मणजे पांडव व कौरव ह्या होत. यांच्यामध्यें बालपणींच कशी स्पर्धा लागून राहिली होती व वैमनस्याचे अंकुर कसे पोसले गेले होते हें दाखवित असतां, व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं आढळून येणारें स्वभाववैचित्र्य भारताम धरूनच रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. नाट्यकलेचा महाराष्ट्रांत प्रथमतः प्रादुर्भाव होऊन जीं पौराणिक नाटकें बाहेर आलीं त्या नाटकांच्या व प्रस्तुतच्या नाटकाच्या एकंदर मांडणींत मोठा फरक दिसेल; पण तो देशकालवर्तमानस्थितीकडे लक्ष्य पोचवून करावा लागला आहे. त्याच्या युक्तायुक्ततेसंबंधाचा विचार रसिक लोकवृंदानें करावयाचा आहे. त्यासंबंधानें आह्मांस मुग्ध रहाणेंच प्रशस्त होय.

शेवटीं ज्या श्रीकृष्णद्वैपायन व्यासांच्या वाणीनें आह्मांला स्फूर्ति दिली व मोरोपंत, मुक्तेश्वर व श्रीधर ह्या महाराष्ट्रीय कवींच्या प्रासादिक सरस्वतीनें प्रोत्साहन दिलें

-त्यांच्या चरणीं अनन्यभावानें प्रणाम करून व सहृदय आणि प्रेमळ अशा लोकवृंदास श्री ज्ञानेश्वरांच्या—

'देखा काव्यनाटका
जे निर्धारितां सकौतुका
त्याचि रुणझुणती क्षुद्र घंटिका
अर्थध्वनी.'

या उक्तीची विनयपूर्वक स्मृति देऊन हा लांबलेला प्रस्ताव पुरा करितों.

पौष वद्य ४ थी,
शके १८२५.

'किरात.'

# द्रोण-प्रकोप

अथवा

## मानभंग आणि सूड.

### प्रवेशक.

[ कल्पनादूत प्रवेश करितो. ]

**कल्पनादूत**—हे प्रेक्षक हो ! माझा हा किरीट, हा विचित्र वेष आणि हे माझे विस्तृत पंख पाहून आपण विस्मयानें चकित होऊन जाल! परंतु आपल्यास असें चकित होण्याचें कारण नाहीं. कारण, मी कवीच्या कल्पनासृष्टींतील एक कल्पना–जन्य दूत आहें. मी माझ्या ह्या विस्तृत पंखांवर आपणा सर्वांस बसवून कालाच्या अमर्याद प्रदेशांतून प्रवास करून आपल्याला प्राचीन भरतभूमीचें रमणीय आणि मनोहर दर्शन करविणार आहें. माझ्या हातांत जी ही संजीविनी यष्टी आहे, हिच्यांत विलक्षण प्रभाव आहे. हिच्या प्रभावानें आपल्याला गतकालीन गोष्टी पुन: एकवार दाखविण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आलें आहे. भारतांतील महाभागांच्या गोष्टी आजपर्यंत आपण पुराणश्रवणाचे अथवा कीर्तनाचे द्वारानें ऐकत होतां, पण यापुढें त्या महाभागांस या संजीविनी यष्टीनें पुन: निर्माण करून आपल्याला त्यांचा पुण्यकारक अद्भुत दर्शनलाभ करून देण्याचें महत्कार्य मीं आपल्या अंगावर घेतलें आहे. तर चला, क्षणैक आपले हे चर्मचक्षू मिटा, तसेच ते काचमय उपनेत्रहि किंचित् दूर करा, आणि मी आपल्याला दिव्य ज्ञानचक्षु देतों त्यांचा स्वीकार करून माझ्या पंखांवर बसा, म्हणजे मी आपल्याला अदृष्टपूर्व अशा गतकालीन पुराणप्रदेशांत नेऊन सोडतों. हे पहा एका भरारीसरशीं आपण कोठें आलों ! हें परम पवित्र गंगाद्वार. तो गुरु अग्निवेश ऋषींचा आश्रम. ते पहा तेथें त्यांचे दोन ऋषिकुमार शिष्य कांहीं बोलत उभे आहेत. ते काय बोलत आहेत तें लक्ष्यपूर्वक ऐका. मग आपल्याला मी अग्निवेश गुरूंचें दर्शन करवितों. तेथून पुढें द्रुपद व द्रोण यांच्या

स्नेहाचा देखावा दाखवून पुढें द्रुपद राजास राज्य प्राप्त झाल्यानंतर त्यास राज-मदानें कशी धुंदी येत आहे व त्या धुंदींत पूर्वीचा स्नेहसंबंध विसरून तो द्रोणाचा कसा मानभंग करित आहे, आणि तसेंच या मानभंगाचा सूड उगविण्याकरितां द्रोणाचार्य कुरुवंशीय राजकुमारांनां आपले शिष्य करून त्यांस धनुर्विद्या व शस्त्रास्त्रविद्या शिकवून त्यांची परीक्षा घेऊन द्रुपदास युद्धांत जिंकून आणण्याची त्यांजकडे वीरांस उचित अशी गुरुदक्षिणा मागत आहेत, हे सगळे हृदयंगम व चित्ताल्हादक प्रसंग, आणि अर्जुन व कर्ण यांच्यांतील स्पर्धा, दुर्योधन, दुःशासन आणि शकुनी यांचे कुटिल विचार, भीमाचें भीम स्वरूप, धनुर्धर पांडवांच्या आश्रयास असलेल्या सूदाचा—बल्लवाचा—हास्यरसाचा पोषण करणारा अदृष्टपूर्व असा वीर्योत्साह व अर्जुनाचें अपूर्व आणि अप्रतिम धनुर्धारित्व व द्रुपदावर विजय संपादून गुरुदक्षिणा देणें, या सर्व गोष्टी क्रमाक्रमानें दाखवीन. मात्र आपलें तिकडे पूर्ण अवधान असूं द्या, चित्तविक्षेप होऊं देऊं नका. आतां माझ्या या यष्टीचें विलक्षण सामर्थ्य पहा.

[ तीनदां यष्टी आपटतो व जातो.

[ स्थळ—अग्निवेश ऋषींचा आश्रम. दोन ऋषिकुमार प्रवेश करितात. ]

**उपमन्यु**—बलाहका ! अग्निवेश गुरुजींचें द्रोणावर आणि पांचालाधिप पृषद राजाचा पुत्र द्रुपद, यांच्यावर किती प्रेम आहे !

**बलाहक**—अरे उपमन्यो ! उघडच आहे. सच्छिष्यांवर कोणत्या गुरूच्यानें प्रेम केल्याविना राहवेल ?

**उपमन्यु**—तें खरें; पण हा ऋषिपुत्र आणि तो राजपुत्र असूनहि या उभयतांमध्यें विलक्षण प्रेम वसत आहे. ऋषिपुत्राचें आणि राजपुत्राचें इतकें प्रेम असणें मलातरी इतके दिवस संभवनीय वाटलें नव्हतें !

**बलाहक**—अरे, पण जगांत नेहमीं असाच चमत्कार असतो, कीं, एकाच विषयाचा व्यासंग करणारे गुणिजन मिळाले, कीं, त्यांच्या ठिकाणीं स्नेहभाव हा यदृच्छेनेंच उत्पन्न झाला पाहिजे. कारण 'समानशीलव्यसनेषु सख्यम्.'

**उपमन्यु**—तूं ह्मणतोस तें बरोबर आहे. तसा स्नेहभाव उत्पन्न होईल. पण, पुढेंमागें राजा तो राजा आणि ऋषिपुत्र तो ऋषिपुत्र, असाच प्रकार व्हावयाचा ! ही आतांची बाळपणची मैत्री पुढेंहि सदासर्वकाळ अशीच टिकेल,

हें संभवत नाहीं ! कारण हे राजपुत्र एकदा राजे झाले, ह्मणजे त्या राजवैभवानें ह्यांनां राजमद चढल्याशिवाय रहावयाचा नाहीं, आणि मग हाच राजपुत्र कदाचित् द्रोणाला ओळखणारहि नाहीं ! ह्मणून ह्मणतों, मनुष्यानें दूरवर दृष्टी पोंचवून अगोदरच सावध असावें, आणि आपल्याशीं समान असेल अशाशींच स्नेह ठेवावा.

बलाहक—तूं ह्मणतोस तेंहि उचितच आहे. द्रोणास सांगून पहा पाहिजेतर. त्यानें ऐकिलें तर ठीकच, नाहीं तर त्याचा धर्म त्याच्याकडे. सांगण्याचा धर्म आपला आहे—पण थांब, हें कोण आलें बरें ? अरे, गुरुजींची स्वारीच इकडे येत आहे. चल तर आपण उपवनांत जाऊन पूजेकरितां पुष्पें घेऊन येऊं.

[ जातात.

---

## अंक १ ला.

## प्रवेश १ ला.

[ स्थळ—गंगाद्वार, अग्निवेश ऋषींचा आश्रम. हातात एक तेजःपुंज अस्त्र घेऊन अग्निवेश प्रवेश करितात. ]

**अग्निवेश**—(स्वगत) हें शस्त्र 'आग्नेय' अस्त्राच्या प्रयोगानें कितीतरी दीप्तिमान झालें आहे! हें ज्या वेळीं मला भारद्वाज ऋषींनीं दिलें, त्याच वेळीं त्यांनीं मला आज्ञा केली होती कीं, होतां होईल तों हें ब्राह्मणांशिवाय इतरांना देऊं नकोस. कारण क्षत्रियांच्या हातीं हें गेल्यास त्यांना राजमदाच्या धुंदींत याचा कुठें उपयोग करावा आणि कुठें करूं नये, याचा विचार रहाणार नाहीं. गुरुजींच्या ह्या आज्ञेमुळें मी मोठ्या विचारांत पडलों आहें, कीं, हें द्रोणाला एकट्यालाच द्यावें, कीं, द्रोणाला आणि द्रुपदाला दोघांनांहि द्यावें. ( इतक्यांत द्रोण येतो त्यास पाहून उघडपणें ) कोण—द्रोण?

**द्रोण**—( येऊन नमस्कार करून ) आचार्य मी अभिवादन करितों. गुरुवर्य, हा इतका दिव्य प्रकाश कशाचा! अग्नीच्या ज्वालांप्रमाणें ज्याच्या दिव्य ज्वाला दिसताहेत, हें काय आहे?

**अग्निवेश**—अरे, हें आग्नेय अस्त्र आहे.

**द्रोण**—हेंच आपण आज आह्मांला देणार होतां ना?

**अग्निवेश**—होय, पण—( कोणी येत आहेसें पाहून ) कोण आलें बरें?

**द्रोण**—माझा गुरुबंधू राजपुत्र द्रुपद. याशिवाय दुसरें कोण असणार?

**अग्निवेश**—नाहीं; त्याच्याबरोबर आणखी कुणी दिसतें आहे.

**द्रोण**—( निरखून पाहून ) हो. तो द्रुपद राजपुत्राचे वडील पृषतराय यांचे पदरचा एक मानकरी आहे. अहिच्छत्र नगरीहून तो नुकताच आला आहे.

[ इतक्यांत द्रुपद व सत्यवच नामक मानकरी येऊन नमस्कार करितात. ]

**द्रुपद**—तातांची प्रकृती अस्वस्थ असल्यामुळें हे मला बोलवायला आले आहेत, आणि आपणतर आह्मांला आज आग्नेय अस्त्र देणार होतां.

**अग्निवेश**—हो, हें पहा तें मीं अभिमंत्रित करून ठेविलें होतें; पण मनुष्याच्या मनाची द्विधा वृत्ती झाली असतां तें देऊन उपयोग नाहीं.

**द्रुपद**—असें असेल तर माझा नाइलाज आहे. मी आत्मसंयमनानें माझ्या मनाची द्विधा वृत्ती होऊं देत नाहीं; मग काय हरकत आहे द्यावयाला?

**अग्निवेश**—अरे पण अशी घाई कां? पृषतरायांच्या प्रकृतीला आराम पडून तूं पुनः आलास म्हणजे देईन मी तुला हें !

**द्रुपद्**—जशी गुरु महाराजांची आज्ञा. घेतोंतर निरोप. (नमस्कार करितो.)

**अग्निवेश**—कुशलीभव.

**द्रुपद्**—भारद्वाज ऋषींच्या चरणांचें दर्शन घेऊन लगेच मी प्रयाण करितों. येतोंतर.

**अग्निवेश**—ठीक आहे, जपून जा. तुझ्या वडिलांना माझे आशीर्वाद सांग.

[ जातात.

**द्रुपद्**—आज्ञा.

**द्रोण**—आणि या गरीब गुरुबंधूला विसरलास वाटतें इतक्यांतच ?

**मानकरी**—( द्रुपदास ) हे कोण ?

**द्रुपद्**—महाराजांचे परम मित्र भारद्वाज ऋषी त्यांचा हा पुत्र द्रोण. हा माझा गुरुबंधू. हा आणि मी या गुरुवर्यांजवळ इतके दिवस धनुर्विद्येची शिक्षा घेत होतों. ( द्रोणास उघडपणें ) द्रोणा ! तुला कसा बरें विसरेन मी ? तूंतर माझा गुरुबंधू. पण काळजींत असलेल्या माणसाला कांहीं सुचत नसतें, म्हणून तूं मला क्षमा करावी.

**द्रोण**—मग याबद्दल तुला कोण दोष देतो ? पण म्हटलें, तुझ्या वडिलांनीं पुढेंमागें तुझ्या हातीं राज्याधिकार दिला, आणि यदाकदाचित् मी जर तुजकडे आलों, तर आपलें हें गुरुबंधुत्व स्मरून तुलाच माझा संभाळ केला पाहिजे !

**द्रुपद्**—अरे द्रोणा, मी राजा झालों म्हणून काय झालें ! ज्याच्याशीं जोडीनें मी ही धनुर्विद्या शिकलों. त्या माझ्या गुरुबंधूला मी विसरेन ? ही गोष्ट कालत्रयींहि व्हावयाची नाहीं ! राज्य तुझें आहे असें समजून बेलाशक वाटेल तेव्हां तूं ये. तुझ्या येण्यानें उलट मला आनंदच होईल.

**द्रोण**—( मानकऱ्यास ) अहो सत्यवच ! द्रुपद काय म्हणतो हें लक्ष्यांत ठेवा बरें. पुढेंमागें बदलेल म्हणून सांगतों.

**द्रुपद्**—बदलेन? ही गोष्टतर कालत्रयींहि व्हावयाची नाहीं! तुला जर विश्वास येत नसेल तर चल ( द्रोणाचा हात आपल्या हातांत घेऊन ) हें घे वचन—मी राजा झालों कीं माझें अर्धें राज्य तुझें आहे, असें समज.

**द्रोण**—छेः छेः, वचन कशाला? मनुष्याचा शब्द हा वचनाहूनहि जास्त आहे. तरी पण द्रुपदा, मनुष्याला राज्यमदाची एकदा धुंदी आली, म्हणजे मग त्याला कांहीं दिसेनासें होतें, ही जगाची रीतच आहे. म्हणून बजावलें आपलें तुला, इतकेंच!

**द्रुपद**—( हंसत) अस्सें? बरें येतोंतर! (दृढ आलिंगन देऊन) तुझा माझा स्नेह अस्सा दृढ रहाणार. [मानकन्यास] सत्यवच! चला, तयार आहेत घोडे? यांच्या वडिलांचें दर्शन घेऊन निघूंच. (द्रोणास) चल.

**द्रोण**—म्हणजे? आमच्या इथें थोडें उपहाराचें घेतल्याशिवाय जाणार? तेवढें मात्र व्हायचें नाहीं. चला, चला सत्यवच तुम्हींहि चला. [ सर्व जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थळ—हस्तिनापुर. कृपाचार्य प्रवेश करितात. ]

**कृपाचार्य**—गौतममुनींची कन्या, अर्थात् माझी कनिष्ठ बहीण शारद्वती, भारद्वाजपुत्र द्रोणाचार्यांनां शंतनूराजानें वेदविधानीं अर्पण केली, आणि त्यांनीं तिचें पाणिग्रहण केलें. या गोष्टीला आज जवळजवळ सातआठ अब्दें होत आलीं. शारद्वतीला पुत्र होऊन त्याचें नांव अश्वत्थामा ठेवल्याचेंहि मला श्रुत झालें, पण या कुरुपुत्रांनां धनुर्विद्या शिकविण्याकडे मी गुंतल्यामुळें मला आजवर तिला भेटण्यास झालें नाहीं; तर राजा धृतराष्ट्रास सांगून शिबिका वगैरे देऊन राजदूत आणि दासी पाठवून तिला आणवूं. मलाहि अद्याप पुत्र नाहीं, तेव्हां भगिनीपुत्राला पाहूनतरी समाधान मानूं. अथवा द्रोणाचार्यांनांहि इकडेच बोलवावें; कारण भार्गवरामापासून त्यांनीं कांहीं अस्त्रविद्या संपादन केली आहे, तेव्हां तेहि जर इकडे आले, तर त्यांच्यापासून आपल्यासहि ती विद्या शिकतां येईल, आणि मग या कुरुपुत्रांसहि ती थोडथोडी शिकवितां येईल. तो अर्जुन आणि कर्ण तर मला नाहींनाहीं ते प्रश्न विचारून केव्हांकेव्हां कुंठित करितात. मला त्यांचें समाधान करितां येत नाहीं. तेव्हां द्रोणाचार्यांनां येथवर बोलवावें हेंच उचित. आर्वेचतर, आणखी अगोदर आजच्या आज राजदूत धाडून द्यावेत. [ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ—द्रोणाचार्यांच्या आश्रमाजवळील एक क्रीडाभूमी. द्रोण आड बाजूस उभे आहेत; इकडे अश्वत्थामा व इतर श्रीमंतांची मुलें धनुष्यबाण घेऊन खेळत आहेत; खेळ होतांच श्रीमंतांचे मुलांस खेळण्याचे ठिकाणीं दुधानें भरलेले सुवर्णाचे पेले येत आहेत. ]

**पहिला मुलगा**—ए अश्वत्थाम्या! तुला कुठें आहे दूध? हें बघ आमच्या घरून आम्हांला पाठवून देतात.

**दुसरा मुलगा**—ए अश्वत्थाम्या! इकडे येरे तूं! हें घे दूध तुला. ( असें ह्मणून अश्वत्थामा जवळ येतांच तो दूध पिऊन टाकतो. )

**तिसरा मुलगा**—(दुसऱ्यास) कायरे, त्याला असें फसवितोस काय?, अश्वत्थाम्या इकडे ये आपला तूं. मी माझ्यांतलें निम्मे दूध देतों तुला.

**अश्वत्थामा**—मला कुणाचेंच नको जा! मी घरीं जाईन आणि आईकडून घेईन मागून आपला. [ रागें रागें निघून जातो.

**द्रोण**—( बाजूस स्वगत ) श्रीमंती आणि दारिद्य यांमध्यें केवढें हें अंतर! देवा, या अर्भकानें असें काय पाप केलें आहे, कीं, यालादेखील बालपणापासूनच हे दारिद्यजन्य अवमान सहन करायास लागावेत! हा माझ्यासारख्या भिकाऱ्याच्या घरीं जन्मास आला, हा याचा अपराध काय? अथवा याचा अपराध कसला! हा सर्वस्वी माझाच अपराध आहे! मीच जर शंतनूराजाच्या वचनाला मान न देतां त्या-गौतमकन्या-शारद्वतीचें पाणिग्रहणच न करितों, तर हा असा प्रसंग येतातरी कशाला? असो. होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल आतां खेद करून काय उपयोग? हा रागारागानें घरीं जाऊन काय करणार! तिच्याजवळ जाऊन हा दूध मागेल. पण आपल्या आश्रमांत जर एकसुद्धां धेनू नाहीं, तर तीतरी याला दूध कुठून देईल? [ जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—द्रोणाचार्यांचा आश्रम. कृपी ( शारद्वती ) व अश्वत्थामा बोलत असतां द्रोण आड येऊन उभे रहातात. ]

**अश्वत्थामा**—आई! मग देतेस ना मला दूध?

**कृपी**—देतें हां माझ्या बाळाला! (डोळ्यांत पाणी आणून स्वगत) मी याला दूध देतें असून ह्मटलें आहे, पण मी तें कुठून देणार! (सुचल्यासारखें करून स्वगत)

हो, अथवा असं केलं तर—साळीच्या लाह्यांचं पीठ करून ठेवलंच आहे घरांत; तें जर याला पाण्यांतून कालवून दिलं, तर तें स्वच्छ दुधासारखं पांढरं दिसेल.

**अश्वत्थामा**—आई, तूं अशी रडतेस कां ग? तूं अशी रडून देणार असलीस, तर नको तें मला!

**कृपी**—(हंसल्यासारखें करून त्याचें चुंबन घेऊन) छेः, रडतें आहें कुठं मी? वेडंच बाई माझं पोर हें! (पीठ घेऊन एका द्रोणांत कालवून त्यास देते.)

**अश्वत्थामा**—द्रोणांत नको जा मला! पिंवळ्या नाहीं तर पांढऱ्या पेल्यांत दे.

**कृपी**—(स्वगत) त्या श्रीमंतांच्या मुलांचं पाहून हा सोन्यारुप्याच्या पेल्यांतून मागतोय दूध! पण पर्णपात्रांशिवाय आमच्या इथं दुसरं कुठलं पात्र येणार! कुणालाहि झालं म्हणून काय झालं, सगळं पुरवेल पण हें दारिद्र्य नाहीं पुरवणार! (उघड) आपण ब्राह्मण आहों. तसल्या पांढऱ्या आणि पिंवळ्या पेल्यांतून दूध पिऊं नये आपण. ते पेले निषिद्ध आहेत, आपल्याला असले द्रोणच चांगले.

**अश्वत्थात्मा**—हो का? देतर मग, त्या द्रोणांतूनच दे मला.

**कृपी**—(कालविलेल्या पिठाचा द्रोण देते) हें घे.

**अश्वत्थामा**—(पिऊन) वाः कितीतरी गोड आहे ग हें? हें बघ आई, असं मला रोज देशील ना?

**कृपी**—(त्याचे तोंडावरून हात फिरवित चुंबन घेऊन) देईन हां माझ्या बाळाला.

**अश्वत्थामा**—बरें तर, मी जातों आतां खेळायला.

**कृपी**—जा, पण हें बघ, दुसऱ्या कुणीं दिलेलं दूध पिऊं नको हां! आपण ब्राह्मण आणि ते क्षत्रिय. त्यांच्या भांड्यांतलं दूध आपल्याला उपयोगी नाहीं.

**अश्वत्थामा**—बरं, मी नाहीं त्यांचं प्यायचा.

[ तिरकमठ्याम बाण लावित नाचत जातो.

**कृपी**—(स्वगत) याला मी दुसऱ्यांनीं दिलेलं दूध पिऊं नको म्हणून सांगितलं, पण कुणीं आग्रह करून जर तें याला दिलं आणि खऱ्या दुधाची जर याला रुची कळली, तर मीं पाणी घालून कालवून दिलेलं हें पीठ आज जितक्या आवडीनं हा प्याला, इतक्या आवडीनं तें हा कधींतरी पिईल काय? आपण ब्राह्मण आहों, दुसऱ्यांच्या पात्रांतलं दूध आपल्याला चालायचं नाहीं, म्हणून मीं त्याला सांगितलं आहे, हें एका प्रकारं बरंच आहे. एरवीं दुधाला काय? कोणच्याहि पात्रांतून घेतलं म्हणून तें थोडंच अशुद्ध होतंय? अंबे, आमचे हे पांच कवीं

फेडशील ? आतां घरांत आल्यावर मी साफ सांगतें कीं, पोराकरितां कुणाकडून तरी एखादी गाय मागून आणाच म्हणून ! द्रव्यासाठीं कुणाची सेवा करायची नाहीं, असा तिकडचा निश्चय आहे. पण मी म्हणतें, कुणाकडून ती दान म्हणून घ्यायला काय हरकत आहे ? याला खऱ्या दुधाची रुचि कळली नाहीं, तोंपर्यंत मीं दिलेल्या पिठवणीवर तो स्वस्थ बसेल. पण एकदा त्याला ती रुचि समजली, म्हणजे मगमात्र तो कांहीं केल्यानं माझं ऐकायचा नाहीं. मुलं अजाण म्हणून त्यांनां असं फसवायचं ! पण अशा फसविण्यानं आम्ही काय बरं शिकवतों त्यांनां ! आतां त्यांनां असं फसविण्यांत आमचा कांहीं वाईट हेतु नसतो, तरी पण आपलं दारिद्र्य छपविण्याकरितां आणि पोरांची तोंडमिटवणूक करण्याकरितांतरी आम्हांला ही फसवणूक करावी लागते ना ! एकूण फसवणूकच ही ! मग ती कशाकरितांहि असो ! (विचार करून) हो. अथवा जिथं कृपदादा आहे, तिकडेच जाऊं या, म्हणून सुचविल तर ! सुचवूनतरी पाहूं काय म्हणणं होतंय तें ! त्या लाह्यांचं आणखी थोडसं पीठ करून ठेवावं. (जाऊं लागते. तों द्रोणांस पाहून) अग बाई, कोण तें !

**द्रोण**—( डोळ्यांत आंसवें आलेले पुढें येऊन ) दुसरें कोण असणार !

**कृपी**—म्हणजे ! केव्हांसं यायचं ?

**द्रोण**—अश्वत्थाम्याच्या मागोमागच.

**कृपी**—तर मीं त्याला हें—दिलेलं पाहिलं वाटतं ?

**द्रोण**—हें काय ? दूध ना ? त्याची समजूत करण्याकरितां तूं जें दूध निर्माण केलेंस तें पाहूनतर माझ्या पोटांत अगदी एकच ब्रह्म कालवल्यासारखें होऊन गेलें आहे ! (स्वगत) अरे ! अरे ! अरे ! पोराला घोंटभर दूध प्यावयाला द्यायलाहि एखादी गाय असूं नये आपल्याजवळ ! जळो हें निर्धनिकांचें जीवित्व ! धनाच्या अभावामुळें हव्या त्या वस्तू मिळत नाहींत आणि संसारांत राहून हव्या त्या वस्तू जर प्राप्त होत नाहींत, तर तो संसार कसला ! तो निःसार संसार ! आणि अशा निःसार संसारांत मग सुख कुठून येणार ? आणि संसारांत जर सुख नाहीं, तर जगण्यांततरी अर्थ काय ? (उघड) बोल, दूध म्हणून तूं त्याला पिठवणी दिलीस ना ? ती पिठवणी त्याला दुधासारखी लागली असेल; कारण दुधाच्या भावनेनेंच त्यानें ती प्राशन केली; पण तो ती पीत असतां मला जो एकेक हुंदका येई, त्याच्याबरोबर माझ्या पोटांत विषाचा एकेक घोंट गेल्याप्रमाणें होई. आपल्या कुटुंबाची अशी दरिद्री स्थिति पहात जगण्यापेक्षां मेलेलें काय वाईट ! म्हणजे आपुढेंतरी दारिद्र्यापासून आपल्या स्वताच्या बाबकापोरांस होणारें दुःख

आणि त्यांच्या हालविपत्ति हींतरी पहाण्याचा प्रसंग यावयास नको. (शस्त्र काढून खुपसून घेऊं लागतो.)

कृपी—हें काय, भलतंच काय करायचं बाई! असं भलतंच करण्यापेक्षां तें शस्त्र अगोदर माझ्याच पोटांत खुपसावं, अन् मग आपलं आपण वाटेल तें करून घ्यावं! माझ्या लग्नाच्या वेळीं शंतनू राजे इकडे कितीतरी गाई आणि संपत्ति देत होते, पण त्या वेळीं 'आपल्यासारख्या ब्राह्मणांनीं असल्या वैभवाचा स्वीकार करूं नये' असं ह्मणून त्याचा निषेध केला; आणि आतां पोराला एक घोंटभर दूध पाहिजे तर घरांत एकदिखील गाय नाहीं! मग हीं इतकीं हाडाचीं काडं करून उपयोग काय! कृपदादानं एवढंसं अध्ययन केलंन पण तो आज अन्नापाण्यालातरी महाग नाहीं. '

द्रोण—(खेदानें) मग त्याच्याकडे जातेस का?

कृपी—त्याच्याकडे! आणि मी एकटी? प्राण गेल्यानं जाणार नाहीं मी एकटी! इकडून जर यायचं होत असेल, तर मात्र माझ्याकडून या घटकेला दिखील निघायची तयारी आहे!

द्रोण—छेः छेः छेः छेः! अशा विपन्नावस्थेंत मनुष्यानें आपल्या आप्तवर्गीयांचे घरीं जाणें ही अत्यंत अनुचित गोष्ट! तें मनुष्याच्या अपमानाला आणि खेदाला मात्र कारण व्हायचें.

कृपी—अशा पडत्या काळीं जर आप्तांचा उपयोग करून घ्यायचा नाहीं, तर मग त्यांचा आप्तपणा पाहिजेतरी कशाला बाई? ह्मणे, आप्तांच्याकडे जाणं अपमानाला आणि खेदाला कारण व्हायचं! मग दुसरीकडेतरी जावं कुठं. इथंच काय ठेवलंय आपलं पुरून? तो द्रुपदराजा कीं त्रिपदराजा इकडचा अगदीं जीवश्चकंठश्च मित्र आहेना? मग त्याच्याकडे कां नाहीं जात? त्यानं अर्धं राज्य इकडचं आहे ह्मणून सांगितलं आहे, असं जेव्हांतेव्हां सांगायचं! पण उपयोग काय त्याचा? दादाकडे नाहीं जायचं तर तिकडेतरी जावं. नाहींतर दादासारखं एखाद्या राजाजवळ त्याच्या मुलांनां शिकवायलातरी रहावं कुठं. नाहीं तर ही धनुर्विद्या घेऊन काय जाळायची आहे? सेवा करायची नाहीं आणि दानहि घ्यायचं नाहीं, ह्मणजे काय बाई! पोरांबाळांनीं उपाशीं का मरावं?

द्रोण—(स्वगत) दारिद्र्य असलें ह्मणजे पुरुषांनां बायकांनींसुद्धां धोंबलोंचून घ्यावें, यांत नवल काय? ही ह्मणते धनुर्विद्या काय जाळायची आहे! तर काय पोट जाळायला मी तिचा उपयोग करूं! (उघड) कृपाचार्यांकडे जाण्यापेक्षां

द्रुपदराजाकडे गेलेलेंच हुशार वांत्यांनीं उत्तम ! त्यानें मला वचन दिलें आहेन, तो अंतर देणार नाहीं आपल्याला.

कृपी—तिकडेच जाऊं; पण त्याचीतरी बुद्धि स्थिर रहाते याचा काय नेम ! कारण राजांची बुद्धि स्थिर नसते; सगळेच कांहीं शंतनु नसतात. पण जशी इकडची इच्छा. मात्र यापुढं इथं नाहीं रहायचं. वीट आला आहे मला अगदीं इथला.

द्रोण—चल तर, यापुढें इथें अन्न अथवा पाणी यांतून एकहि ग्रहण करायचें नाहीं. अश्वत्थाम्याला घेऊं आणि निघूंच. चल.

[ जातात.

---

## प्रवेश ६ वा.

[ स्थल—पांचाळपूर येथील द्रुपद राजाचा दरबार. द्रुपद राजा व इतर सरदार आणि मानकरी प्रवेश करितात. ]

द्रुपद—मीं सांगितल्याप्रमाणें व्यवस्था ठेवा, आणि ज्यांनीं पुंडावा केला आहे त्यांचा शोध लावून त्यांनां धरून आणा, म्हणजे त्यांनां योग्य शासन केलें जाईल. राजदंड कसा असतो, याची त्यांनां अजून कल्पना नाहीं. राजांनीं आपल्या राज्यांतून अराजक लोकांचा सुळसुळाट समूळ नाहींसा करून टाकिला पाहिजे, त्याशिवाय त्यांच्या प्रजाजनांनां कधींहि सुख व्हावयाचें नाहीं; आणि प्रजाजनांनां जर सुख नाहीं, तर मग तें राज्य कसलें ? प्रजाजनांच्या सुखांतच राजाचें सुख गुरफटलेलें असतें. म्हणून म्हणतों, या अराजकांचें बीं समूळ नाहींसें करून टाकिलें पाहिजे.

( इतक्यांत एक दूत प्रवेश करितो. )

दूत—( ललकारून ) महाराज ! राजद्वारीं कोणी एक ब्राह्मण आले आहेत.

द्रुपद—ब्राह्मण आले आहेत ! जा घेऊन ये त्यांनां इथवर.

दूत—आज्ञा महाराज.

द्रुपद—( स्वगत ) कोण येणार बरें या वेळीं ?

( किंचित्कालानें दूत द्रोणाचार्यांसह येतो. )

द्रोण—द्रुपद राजाचें कल्याण असो.

द्रुपद—आपण कोण ?

द्रोण—( स्वगत ) मी कोण ? म्हणजे ! याला इतक्यांतच इतकी धुंदी आली कीं काय ! ( उघड ) मी एक ऋषिपुत्र आहें, मला द्रोण म्हणतात.

**द्रुपद्**—द्रोण ! ( कपाळास आंठ्या घालून ) आपल्या वडिलांचें नांव काय ?

**द्रोण**—( स्वगत ) द्रोण हें नांव सांगूनसुद्धां याला माझी ओळख पटत नाहीं ? ( उघड ) माझे वडील ? माझे वडील ऋषि भारद्वाज. ( स्वगत ) आतांतरी पाहूं ओळख पटते का ?

**द्रुपद्**—हो, त्यांचें मला एकदा दर्शन झाल्यासारखें वाटतें. पण केव्हां आणि कुठें, तें मात्र बरोबरसें स्मरत नाहीं.

**द्रोण**—( स्वगत ) इतकें स्मरण नाहींसें झालें एकून ? राजमदाच्या अंगीं स्मृति-पटलावर भयकर दाट आवरण निर्माण करण्याची केवढी अचाट शक्ति आहे ! बरें तर याला आतां गुरुबंधुत्वाची ओळख देऊन पाहूं. ( उघड ) हे द्रुपदराजा ! लहानपणीं गुरु अग्निवेशमुनि यांचेजवळ तू धनुर्विद्या शिकायास होतास, ती आठवण आहे का ?

**द्रुपद्**—हो आहे, मग ?

**द्रोण**— मग ! आपण शिकावयास असतांना तेथें दुसरे कुणी विद्यार्थी असल्याची आठवण आहे का ? तुमचे आमचे एक गुरु असून तुला आपल्या गुरुबंधूचा इतक्या लवकर विसर पडावा, हें फार चमत्कारिक आहे !

**द्रुपद्**—( स्वगत ) ही स्वारीतर अगदी एकेरी बोलण्यावर आली. तेव्हां आतां असें नाहीं उपयोगी. ( उघड ) मला वाटतें गुरु अग्निवेशाजवळ तुमच्या सारखे पुष्कळ शिष्य होते असतील शिकायला—त्यांत तुम्हीहि असाल. तुम्ही अमकेच हें मीं कसें ओळखावें, त्या वेळचा आपला तसा कांहीं विशेष परिचय असल्याशिवाय ?

**द्रोण**— हें पहा, राजा ! ज्या वेळेस तुझ्या वडिलांची प्रकृती अस्वस्थ असल्यामुळें तुला येथें घेऊन येण्याकरितां एक मानकरी बोलवायला आले होते ( सत्यवच प्रधानाकडे बोट करून ) मला वाटतें हेच असावेत ते, हे तुझे प्रधान झाले आहेत वाटतें ! मग बरोबरच आहे ! त्या वेळेला मीं तुला काय म्हटलें आणि तूं माझा हात आपल्या हातांत घेऊन मला काय वचन दिलेस, याची कांहीं स्मृति आहे का तुला ? काय हो ! तुम्हांलातरी कांहीं स्मरतें का ?

**सत्यवच**—नाहीं, मलातर तुम्ही म्हणतां यांतलें कांहींच स्मरत नाहीं.

**द्रुपद्**—काय ! मीं वचन दिलें ?

**द्रोण**—अग्निवेश गुरूंचेकडून तूं ज्या वेळेस जावयास निघालास त्या वेळेस माझा हात आपल्या हातांत घेऊन मला काय वचन दिलेंस ? 'राज्य तुझें आहे

असें समजून तूं बेलाशक ये; मी आपल्या गुरुबंधूला कसा विसरेन !' हे त्या वेळचे तुझे शब्द होते; आणि ह्या शब्दांवर विश्वसूनच मी आज तुझा आश्रय मागावा ह्मणून इथें आलों. दरिद्र्याघ्र माझे मागें लागून त्यानें माझें नरडें धरलें आहे, आणि तुझ्यासारख्या गुरुबंधूशिवाय क्लेशातीत करण्यास दुसरा कुणीहि नाहीं, असें समजूनच मी तुझ्याकडे आलों. तूच जर मला ओळख देत नाहींस तर तुझे हे मानकरी कसे देतील ?

**द्रुपद**—कोण मी गुरुबंधु ! पण मलातर तुमच्याबरोबर अभ्यास केल्याचें कांहींच स्मरत नाहीं. मला वाटतें तुमची कांहींतरी चूक होत आहे. तो कुणीतरी दुसरा राजपुत्र असेल !

**द्रोण**—काय स्मरत नाहीं ह्मणतोस ! तो कुणीतरी दुसरा राजपुत्र असेल ! हः, स्मरत नाहीं ? मी नको ह्मणत असतांहि माझा हात आपल्या हातांत घेऊन वचन दिलेलेंहि स्मरत नाहीं ? माझ्या इथे उपहाराचें घेतलेलेंहि स्मरत नाहीं ? आणि मला कडकडून दृढालिंगन दिलेंस तेंहि स्मरत नाहीं ?

**द्रुपद**—तुह्मी ह्मणतां यांतलें बिलकुल कांहींएक स्मरत नाहीं ! आणि तुह्मी तर गुरुबंधुत्वाचें नातें लावून अगदीं एकेरी शब्दानें बोलून संबंध जुळवूं पहातां ! मला वाटतें तुमची कांहींतरी चूक होत आहे खास ! काय ह्मणे गुरुबंधु ! अन् मीं यांना अभिवचन दिलें होतें कीं 'अर्ध राज्य आपलें आहे असें समजून बेलाशक ये ह्मणून !' ( सरदारांस ) मलातर हे अघळपघळ ब्राह्मण दिसतात ! अहो, राजपुत्राचा आणि ऋषिपुत्राचा असा स्नेह अथवा असें बंधुत्व असल्याचें कुणीं कधीं आजपर्यंत ऐकिलेंतरी आहे काय ? योग्य आणि अयोग्य, धनिक आणि निर्धनिक, उदार आणि कृपण, हृदयशुद्ध आणि चित्तमलीन, कर्मभ्रष्ट आणि आचारशील, मूर्ख आणि विद्वान्, सज्जन आणि कुटिल यांची, त्याचप्रमाणें वेदांती आणि चार्वाक, मीमांसक आणि कौलिक, विरक्त आणि विषयासक्त, क्लीब आणि झुंजारशूर, धीर आणि भीरु, श्रोत्रिय आणि अश्रोत्रिय, याचक आणि कद्रू, मानी आणि अवमान करणारे, सभ्य आणि निर्लज्ज यांची परस्पर मैत्री असल्याचें कधीं कुणी ऐकिलें आहे ?

**द्रोण**—अरे द्रुपदा—

**द्रुपद**—(न ऐकतां) अहो रत्नाच्या माळेंत कुणीं कधीं भल्लातक ओंवील काय ? कुणी झालें तरी शर्करा घृतांत आणि लवण तक्रांतच घालील, एरवी तें समरस कसें होणार ? उघडच आहे, पृथ्वीपतीचा सखा पृथ्वीपतीच असला पाहिजे

आणि भिकारड्या भणंगाचा सखा त्याच्यासारखाच एखादा दरिद्रीच असला पाहिजे. दोघांचें कुलशील, ज्ञान, वैभव आणि योग्यता हीं समसमान असल्याशिवाय त्यांची मैत्री व्हावी कशी ? आणि हा भिक्षुक ब्राह्मणतर मला गुरुबंधु म्हणून हाक मारतो ! कसला गुरु आणि कसला बंधू ! माझ्यासारख्या राजाला आपला गुरुबंधु म्हणणारा हा बुद्धिमंद निःशंकपणें मिथ्या भाषण करतो आहे—नी दुसरें काय ? अरे भिक्षुका ! तुला हवें असल्यास इथें एक वेळ भोजन मिळेल.

**द्रोण**—अरे जा ! तुझ्या भोजनाची कोण इच्छा करतो आहे !

**द्रुपद**—तर चल निघ या घटकेला इथून ! मुकाट्यानें चालता हो आल्या वाटेनें ! नाहींतर मला आपल्या दूतांकडून तुझी बोळवण करावी लागेल !

**द्रोण**—इतकी तसदी नाहीं पडूं देत मी आपल्याला ! हा चाललों मी ! येतोंतर—पण तूं एवढें लक्ष्यांत ठेव, कीं, तूं जाणूनबुजून विश्वासघात, वचनभंग आणि ब्राह्मणाचा—आपल्या गुरुबंधूचा—अवमान आणि मानभंग करून माझा कोपाग्नि प्रज्वलित केला आहेस, तो शांत करण्याकरितां मी तुझ्यावर योग्य सूड उगवीन तरच मी नांवाचा द्रोण ! येतों, येतों—

**द्रुपद**—यावें ! यावें! ब्राह्मणाच्या हातून जीभ लवलव करण्यापलीकडे काय होणार आहे, हें मी पुरें जाणून आहें !

[ पडदा पडतो.

**द्रोण**—( द्रुपद राजाच्या दरबारांतून बाहेर येऊन स्वगत ) मी येतों म्हटलें तर 'यावें यावें !' म्हणून हा माझी आणखी वर अवहेलना करितो ! मनुष्याला सर्व कांहीं पुरवेल, पण अवमान व अवहेलना हीं मात्र त्याच्यानें कधीं सहन होणार नाहींत. ठीक आहे. ब्राह्मणाची जीभ लवलवते कां शस्त्र लवलवतें, तेंहि तूं लवकरच पहाशील म्हणावें ! या अवमानाचा सूड उगविला पाहिजे—( दांतओंठ चावून ) हो अस्सेंच ! हस्तिनापुराला जावें आणि तिथें कुरुनंदनांनां आपले शिष्य करून त्यांनां भार्गवरामांकडून संपादिलेली ही अमोघ अस्त्रविद्या शिकवून तयार करावें, आणि त्यांच्याकडून त्या उन्मत्त गुरुबंधूला आलेली जी ही ऐश्वर्याची धुंदी ती उतरावी आणि त्याजबरोबरच माझ्या दारिद्र्याच्या दीर्घ वल्लीच्या कांद्याचें मूळहि समूळ उपटून टाकावें. त्यांतल्यात्यांत मीं एवढें बरें केलें कीं, पुत्राला आणि तिला नाहीं मी त्या दुष्टाच्या दरबारीं घेऊन आलों ! त्यांनां घेऊन येतों आणि त्यांच्यासमक्ष जर माझा हा असा अवमान होता, तर तो मला मरणाहूनहि जास्त असह्य झाला असता; पण तिला मी मोठ्या आग्रहानें मुद्दाम

नगराबाहेरच्या देवळ्यांत बसवून मी जाऊन शिबिका वगैरे पाठवून देतों ह्मणून सांगून इकडे आलों; माझा हा असा अपमान झालेला पाहून तिला काय वाटेल बरें ? स्वताच्या स्त्रीचा मर्मभेदी एक शब्द ह्मणजे शत्रूच्या सहस्र शस्त्रांपेक्षांहि जास्त तीव्र आणि प्रखर असणार ! पण आतां काय त्याचें ? आतां भिऊन काय उपयोग ? मला आतां दगडापेक्षांहि घट्ट अंतःकरण केलें पाहिजे.

[ जातो.

---

## प्रवेश ६ वा.

[ स्थल—अहिच्छत्र नगराचे बाहेरील देवालय.

कृपी अश्वत्थाम्यासह उभी आहे. ]

**अश्वत्थामा**—आई, इथं उन्ह लागत ग ! चल, देवळांत सावलींततरी जाऊन बसू.

**कृपी**—थांब बाळा, इतक्यांत शिबिका घेऊन कुणीतरी राजदूत येतील, ते आले ह्मणजे आपण राजवाड्यांतच जाऊं. माझ्यानं आतां चढउतर होत नाहीं अगदीं. चालूनचालून माझे पाय अगदीं कसे दुखून गेले आहेत. (इतक्यांत द्रोण येतात त्यांस पाहून) हें काय बाई, इकडूनच परत यायचं ! शिबिका कुठं आहे ?

**द्रोण**—शिबिका ! ( डोळ्यांत अश्रू येतात. ) आतां माझ्या बाणांनीं शिबिका निर्माण करून तींत बसून आपण तिघेंहि स्वर्गलोकीं प्रयाण करूं ! ह्मणजे माझ्या धनुर्विद्येची सांगता होईल, आणि मग इथें या दारिद्र्यांत आणि अपमानांत तरी राहायला नको !

**कृपी**—ह्मणजे ! द्रुपदराजानं अपमान केला कीं काय इकडचा ?

**द्रोण**—नुसता अपमानच काय, त्यानें नुसती ओळखदेखील दिली नाहीं मला ! अपमान, वचनभंग, विश्वासघात आणि मानभंग !

**कृपी**—तरी इकडे यायचं ठरवायचं झालं तेव्हांच मला वाटलं कीं, राजाची बुद्धि स्थिर कशी रहाणार ? अन् मीं ह्मटलंहि होतं पण इकडे तसं, पण—

**द्रोण**—पण—आतां काय त्याचें. इथवर आलों आणि शोभा व्हायची होती तीहि पण झाली.

**कृपी**—मग आतां पुढं ?

**द्रोण**—पुढें काय ?

**कृपी**—तर ह्या नीचानं केलेला अपमान असा सहन करून राहायचं ?

**द्रोण**—हो, सहनच केला पाहिजे. ब्राह्मणानें सहनशीलत्व असलें पाहिजे. त्याशिवाय त्याला दुसरा मार्ग काय आहे ?

**कृपी**—मार्ग काय आहे ? ही कृपी वीरवर शंतनू राजाच्या—महान् क्षत्रियाच्या—अन्नावर वाढलेली आहे. चला, मी दाखवितें इकडे मार्ग काय आहे तो ! बाणांची शिबिका करून त्यांत बसून आपण स्वर्गलोकीं जाण्यापेक्षां त्या नराधमालाच त्या शिबिकेंत बसवून स्वर्गलोकीं पाठवा, म्हणजे तिथं तो हातांत पाश घेऊन बसलेला कृतांत काल यम त्याची जिभली तोडून वचनभंगाच्या पातकाबद्दल त्याला योग्य शासनतरी करील. ह्या मृत्युलोकासारखा तिथं खास अन्याय होणार नाहीं ! चला, आपण हस्तिनापुराला जाऊ; तिथं शंतनुपुत्र भीष्म आहेत, ते आजवरतरी मला आपल्या बहिणीसारखी मानित आले आहेत. त्यांच्याजवळ मी आपली ही कर्मकहाणी सांगतें आणि द्रुपदाला जिकून त्याच्या इकडच्या ह्या अपमानाबद्दल त्याला योग्य प्रायश्चित्त देण्याची मी त्यांच्याकडे भिक्षा मागतें. ते सत्यप्रतिज्ञ आहेत; आपल्या बहिणीला ही भिक्षा घालायला ते कधीं माघार घेणार नाहींत.

**द्रोण**—तुझ्या मध्यस्थीनें शांतनव भीष्मांकडे ही भिक्षा मागायची ! ही गोष्ट तर कालत्रयींहि व्हावयाची नाहीं ! द्रुपदाच्या दरबारींच मीं माझ्या ब्राह्मण्याचें विसर्जन करून क्षत्रियव्रताचा अंगिकार करून आलों आहें, आणि यापुढें काय करायचें तेंहि पण ठाम ठरवून टाकिलं आहे. तर चल, प्रथमतः आपण हस्तिनापुरचाच रस्ता सुधारूं. तिथं गेल्याशिवायतर गत्यंतरच नाहीं. कारण माझ्या धनुर्विद्येचें योग्य चीज व्हायला त्याशिवाय दुसरें स्थानच नाहीं. चलातर. ( जाऊं लागतात. ) आपण इथून जातों आहों, पण तुमच्या दोघांशिवाय तिसरें कुणी आपल्याबरोबर येतें आहेसें दिसतेंय तुम्हांला ?

**कृपी**—छेः बाई, दुसरं कोण असणार इथ ! अश्वत्था, तुला दिसत कारे कुणी ?

**अश्वत्थामा**—छेः, कुणी नाहीं !

**कृपी**—छेः बाई, आम्हांला नाहीं कुणी दिसत.

**द्रोण**—छन्, तुम्हांला कसा दिसणार तो ? कारण हा अमूर्त असून वायुरूपी आहे; हा मलादेखील प्रत्यक्ष दिसत नाहीं, मग तुम्हांला कुठून दिसणार ! तरी पण हा मला अगदीं खेंचून बळकट धरून येत आहे. बाहेरून मला कुठें हा धरित आहे म्हणावें, तर माझ्या सर्व अंगांत यानें संचार केला आहे. माझ्याशीं याचें इतकें तादात्म्य झालें आहे कीं, मी व हा आतां अगदीं अभिन्न आहों, असे मला वाटतें ! पण हा असा कोण आहे, हें मात्र मला अजून समजत नाहीं !

पण यानेंतर मला पुरें पछाडल्याचें दिसतें. हा कोणी भूत, पिशाच, समंध अथवा वेताळतर नाहीं ! हा पुण्यपुरुषतर खास नव्हे ! त्या दुष्ट सृष्टीपैकींच कुणीतरी असावा हा ! एरवीं माझ्यासारख्या ब्राह्मणाच्या ठिकाणीं हा संताप, हा त्वेष, डोळ्यांस येणारा हा ताठरपणा, हा कंप व हे हात शिवशिवणें, हे विकार कधींहि संभवायचे नाहींत ! त्या अर्थी, हे अमूर्त आणि वायुरूपी प्राण्या! तूं कोण आहेस, आणि माझ्याबरोबर कां येत आहेस, तें मला स्पष्ट सांग. ( ऐकल्यासारखें करून ) काय म्हटलेंस ? 'तूं अवमानाचा पुत्र कोण आहेस ! आणि या उन्मत्त द्रुपदावर मीं सूड घेऊं ?' ठीक आहे. चलतर, तुझ्याच इच्छे- प्रमाणें होऊंदे. तुझ्यासारख्याचें साह्य असल्यावर मला आणखी काय पाहिजे ? 'सूड, सूड, सूड!' ही अक्षरावली भूमीवर, आकाशांत आणि या पोकळींत लालभडक रक्तानें लिहून काढल्याचें मला स्पष्ट दिसत आहे, त्या अर्थी तो उगवल्याशिवाय मी राहूं कसा ? अवमान सहन करून स्वस्थ बसणारे मनुष्य पुरुष कसले ! क्लीबच ते ! त्यांच्यांत पौरुष आणि मनुष्यपणा असेल तर त्यांचीं डोकीं माझ्यासारखीच फिरून गेलीं पाहिजेत, आणि आपला अवमान करणारा- वर सूड उगविण्यास ते एकसहा शस्त्रें घेऊन उठले पाहिजेत. तरच ते मर्द ! नाहींतर नामर्द आणि पशु ! ! क्रोधा ! चल, हा आलों मी तुझ्याबरोबर. त्या वेळीं तूं जिकडे नेशील तिकडे येण्याला मी तयार आहें.

[ जातात

**[ पडदा पडतो. ]**



# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

[ स्थल—हस्तिनापुराबाहेरील क्रीडाभूमी. एका कूपाजवळ पांडुपुत्र व कौरव, कर्ण, शकुनी इत्यादि खेळत आहेत. द्रोणाचार्य एके बाजूस पहात उभे आहेत, असा प्रवेश. ]

**दुर्योधन**—हा भीम जेव्हांतेव्हां आपली विटी या कूपाच्या बाजूला मारतो. आज यानें ही तिसरी विटी या बाजूला मारलीन् आणि एकदाची विहिरीत घालविलीन्.

**भीम**—अर्जुना! हा दुर्योधन झेलण्याचा आव घालतो, ह्मणून मी लांब विटी मारतों, पण ती एकदाहि याच्या हातीं लागली नाहीं.

**कर्ण**—सरळ मारायला येत असेल, तर ना झेलायची ?

**अर्जुन**—हे शहाणे कर्ण बोलले! अरे, सरळ मारल्यावर पोरींदेखील झेलतील !

**दुःशासन**—अर्जुना! शहाणेबिअणे बोलायचें काम नाहीं ! सांगून ठेवतों—

**भीम**—कां दुःशासना ! अर्जुनाला दरडावतोससा ? ह्या राधेयाचा कैवार घेऊन उगीच भांडूं लागशील तर तुला आणि त्याला दोघांनांहि बरोबरच विहिरींत फेंकून देईन.

**धर्म**—अरे, क्षुल्लक गोष्टींवरून उगीच भांडतां काय ? तुमच्या अंगांत पराक्रम असेल, तर तो एकमेकांशीं भांडण्यांत काय दाखवितां ? ती विटी काढण्यांत दाखवा. ती पाहिलीत विटी इथून दिसते आहे. जो ही विटी काढील, त्याला ही मुद्रिका बक्षीस. ( शकुनी धर्मास धक्का देतो व मुद्रिका कूपांत पडते. )

**शकुनी**—ओहोहोहो! अधर्म झाला अधर्म !! धर्म मुद्रिका दान करू लागला तों मुद्रिकेनें आपण होऊन जलसमाधी घेतली!

**नकुल**—अहो शकुनीमामा ! आपणच दादांच्या हाताला धक्का दिलात आणि बळेंच मुद्रिका पाडलीत ! आणि आतां असें ह्मणतां ?

**शकुनी**—नकुला ! तूं पाहिलास मीं धक्का दिलेला ?

**धर्म**—अरे, विटी गेली, अंगठी गेली, आणि आतां उगीच असें भांडण्यांत काय अर्थ ?

**भीम**—(शकुनीस धरून) विटी गेली, अंगठी गेली आणि आतां यालाहि पण देतों टाकून ! ह्मणजे इजा बिजा अन् तिजा होईल ! ( दुःशासन भीमास धरतो.)

**धर्म**—दुःशासना, तूं कशाला आमच्यांत आलास ? चल दूर हो. भीमा, सोड ह्यांना. वेड्या, क्षुल्लक गोष्टीवरून काय असें भिरडीवर जायचें ?

**भीम**—( सोडून ) अहो दादा, यानें तुमच्या कोंपराला मुद्दाम धक्का दिलेला मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिला.

**धर्म**—बरें, पाहिलास तर पाहिलास. तें जाऊंदे. कूपांतून विटी आणि माझी अंगठी जो बाहेर काढील त्याला माझें हें रत्नजडित करकंकण बक्षीस !

**भीम**—( डोक्याचा मंदिल काढून ) दोघां तिघांच्या मंदिलांना पीळ देऊन तो आंत सोडूं आणि मग त्याला धरून आंत उतरून हलकेंच विटी व अंगठी काढूं.

**अर्जुन**—अरे, पण मंदिल मध्येंच तुटले तर ?

**भीम**—तुटले तर ! एकमेकांचे हात धरून माळची माळ करूं आणि दुर्योधनाला विहिरींत सोडूं. त्याला पोहायला येतेंच आहे ह्मणजे तो विटीहि काढील अन् अंगठीहि काढील.

**दुर्योधन**—मी काटणार अन् तू बक्षीस उपटणार, असेंच कीं नाहीं ?

**भीम**—अर्थात्! मला जर इथे विहिरीच्या कांठीं उभे राहून सर्वांचा भार सहन करावा लागणार, तर बक्षीसहि मलाच मिळालें पाहिजे.

**धर्म**—असा आचरटपणा करून कुठें विटी आणि अंगठी निघत असते ?

**भीम**—आचरटपणा कीं साहस हें ?

**धर्म**—अरे, पण भलतेंच साहस काय उपयोगी ?

**द्रोण**—( स्वगत ) हा यांचा विनोद यांच्या स्वभावाचा द्योतक आहे. पुढें जाऊन आपला कार्यभाग साधण्याची हीच वेळ आहे. तर असेंच करावें. ( पुढें येतात. ) क्षत्रियकुमारांचा विजय असो.

**अर्जुन**—पण इथेंतर सध्या अपजय झाला आहे.

**सर्व**—आचार्यांस अभिवदन करितों. (सर्वजण द्रोणाचार्यांस वंदन करितात.)

**द्रोण**—कल्याण असो. क्षत्रियकुमारांचा अपजय ? मग क्षत्रियकुलावतंसांनीं —भरतकुलांत जन्म घेतलेल्यांनीं—धनुष्यतरी हातांत कशाला धारण करावें ? असाध्य वस्तूंची जर प्राप्ति होत नाहीं, तर हें धनुष्य, ही ज्या आणि हे बाण हीं व्यर्थ नाहींत काय ? धनुर्विद्या शिकविणाऱ्या तुमच्या गुरूंनीं तुह्मांला अजून हें शिकवलें नाहीं, हें मोठेंच नवल ह्मणायाचें ! धिक्कार असो तुमच्या या क्षात्रबलाला आणि या अस्त्रविद्येला !

**शकुनी**—हे आचार्य आमच्या गुरूंची निंदा करितात, तर यांनांच धरून आपण विहिरींत सोडूं, ह्मणजे पहिल्या बुचकळीसरशीच आपली विटी अन् मुद्रिका घेऊन हे वर येतील, तेव्हां मग आपण यांनां वर ओढून काढूं.

**अर्जुन**—(एकीकडे धर्म भीमास) इपार चित्त इश्श विप्र श्रिष्ठांच इन्मात्त पिणान्न इस्स इव्व मिन्न किराण इचात्त निहह! (अपरिचित अशा विप्रश्रेष्ठांचा उन्मत्तपणानें असा अवमान करणें उचित नव्हे.)

**भीम**—( धर्मास ) इच्च इन्मात्त पिण्ण दण्ण मिस्त जिराव्व किय्य ? ( याचा उन्मत्तपणा आणि मस्ती जिरवूं काय ? )

**धर्म**—थिब, शिक्क निस्समि स्पिष्टाच मिगात. (थांब शकुनीस मी स्पष्टच सांगतो.) (शकुनीस) शकुनीमामा, आचार्यांचा असा उपमर्द करणें उचित नव्हे, आणि त्यांतून आपल्यासारख्या कुरुपुत्रांनां. ( आचार्यांस ) आचार्य ! आह्मांला क्षमा असावी. ह्याच्या बोलण्याकडे लक्ष्य न देतां कूपांत पडलेली विटी आणि मुद्रिका कशी काढावी, तें कृपा करून आह्मांला शिकविल्यास आमच्यावर आचार्यांचे फार उपकार होतील.

**शकुनी**—आचार्य शिकविणार आणि आमचे भोळे धर्मदादा शिकणार !

**दुःशासन**—मामा ! तुमच्या ह्मणण्याप्रमाणें मी, तुह्मी, सुयोधनदादा आणि कर्ण असे चौघेजण मिळून या आचार्यांनांच आंत सोडूं चला या.

**भीम**—इत्त विट्ट पिहान्न निहह इप यिग्ग. यिचाच इग्ग दिर किणाक्क तिबवित्त. ( आतां वाट पाहून नाहीं उपयोगी! याचीच अगोदर कणीक तिबवितों !)

**शकुनी**—आह्मांला कळूं नये ह्मणून हे कोणच्यातरी सांकेतिक भाषेनें बोलताहेत. ( पांडवांस ) काय बोलतांरे ?

**भीम**—हेंच बोलतों बघ. ( दुःशासनास एकदम उचलून ) थांब, त्यांनां सोडण्यापूर्वी तुलाच सोडतों अगोदर आंत ! ( शकुनी दुःशासनास सोडविण्यास येतो, त्यास एका काखेत दाबून धरून) आणि ह्या भाच्याच्या पाठोपाठ मामांनांहि देतों कूपांत टाकून !

**द्रोण**—हां हां, हा काय प्रमाद ! सोड सोड, त्याला सोड !

**भीम**—आचार्यांचा अवमान करणाऱ्यांनां ही शिक्षा नको का ?

**द्रोण**—छे ! छे ! असें भलतेंच आचरण उपयोगी नाहीं.

**भीम**—(दुःशासनास व शकुनीस सोडून) चला जा, आचार्यांच्या आज्ञेवरून सोडलें आहे तुह्मांला एक वेळ.

**द्रोण**—हें पहा, ही विटी आणि मुद्रिका कूपांतून बाहेर काढण्यास कूपांत प्रवेश करण्याचें कारणच नाहीं. तुह्मांला चमत्कार पहावयाचा असेल, तर मी ती इथूनच काढून दाखवितों.

**सर्व**—( साश्चर्य ) इथूनच काढून दाखवितां ?

**द्रोण**—हो हो, इथूनच काढून दाखवितों. हें पहा, ह्या मूठभर ईषिका आहेत. या अस्त्रानें अभिमंत्रित करून मी या कूपांत टाकतों. यांचें वीर्य कसें आहे तें तुह्मी पहा. ( कूपाचे सन्निध असणाऱ्या कांहीं दर्भईषिका हातांत घेऊन मंत्रोच्चार-करून त्या कूपांत टाकतो. त्या बरोबर विटी त्या ईषिकांसह वर येते, ती काढून मुलांकडे फेंकतो.) ही घ्या आपली विटी !

**धर्म**—( शकुनी दुःशासनादिकांस एकीकडे ) पाहिलेंत! अशा समर्थ आचार्याचा तुह्मी अवमान करण्यास कसे तयार झालां होतां ते ! एखाद्याचें सामर्थ्य न जाणतां त्याचा उपहास करणें, हें किती मूढपणाचें आणि साहसाचें आहे बरें ! ( उघड ) हे विप्रर्षे ! आमची विटी काढलीत, त्याप्रमाणें कूपांत पडलेली मुद्रिकाहि काढून दाखवा.

**द्रोण**—ठीक आहे, मुद्रिकाहि काढून दाखवितों. ( धनुष्य सज्ज करून कूपांत बाण टाकून अंगठी वर काढतो.) ही घ्या तुमची मुद्रिका !

**सर्व**—(साश्चर्य ) हे ब्रह्मन् आचार्यश्रेष्ठ ! आह्मी आपल्याला अभिवंदन करितों.

**शकुनी व दुःशासन**—आपलें सामर्थ्य न जाणल्यामुळें आमच्या हातून आपला अवमान झाला, त्याबद्दल क्षमा असावी आह्मांला.

**अर्जुन**—पिहह लिंद इप्प मिन्न किरान्न हिचार इत्त क्षिम्म मिग्गात ? किरें किल्लात्त इब्र धिला वणिरें कित्त निच इहाह ! ( पहिल्यांदा अपमान करून हा चोर आतां क्षमा मागतो ! कुरुकुलाची अब्रू घालविणारा किती नीच आहे हा ! )

**भीम**—पिण्ण इत्त यिचिराच दित्त पिडाल कि निहह इत्त इच्याच घिशांत्त ! ( पण आतां या चोराचे दांत पडले कीं नाहीं आतां याच्याच घशांत ! )

**अर्जुन**—निच मिन्न शिव्व शिवाट फिज्ज तिच्च व्हियाच. ( नीच मनुष्याची शेवटीं फजितीच व्हायची. )

**द्रोण**—अरे, क्षमा कसली त्यांत ? एखाद्याचें सामर्थ्य कळण्यापूर्वी जग त्याचा उपहासच करितें ! पण त्याचें सामर्थ्य त्याचे निदर्शनास आलें ह्मणजे मागाहून त्याचा खासच पश्चात्ताप होतो.

**धर्म**—हे आचार्यश्रेष्ठ ! हें सामर्थ्य आह्मांला आजवर अन्यत्र कुठेंहि दिसलें नाहीं. तर आपण कोण, कुठील आणि आपली आह्मांला काय आज्ञा आहे, ती समजूं द्या, ह्मणजे—

**द्रोण**—ह्मणजे काय तुह्मी मला भोजन देणार ?

**धर्म**—भोजन काय ? पण—तें जाऊं द्या.

**अर्जुन**—( धर्मास एकीकडे ) दद् इच रित्र तिच निव्य विच रिव्व. ( दादा, आचार्यांनां त्यांचे नांव विचारावें.)

**धर्म**—आचार्यांनां काय ह्मणतात ?

**द्रोण**—मला काय ह्मणतात त्याच्याशीं तुह्मांला काय करायचें आहे ?

**धर्म**—जशी आचार्यांची मर्जी ! पण आचार्यांनां आमची एक विनति आहे. आचार्यांनी आमच्याबरोबर राजालयापर्यंत येण्याची कृपा करावी.

**द्रोण**—आमच्यासारख्या ब्राह्मणांनां राजदरबारापर्यंत येण्याचे काय प्रयोजन? मी आलों असतों, पण माझा कृतनिश्चय झाला आहे कीं, बोलाविल्याशिवाय कुणाकडेहि जावयाचें नाहीं; त्यांत राजदरबारीतर मुळीच नाही ! कारण, राजसभेच्या ठिकाणीं अनाहूत गमन केल्यास तें अपमानास कारण होत असतें, असा सर्वज्ञांचा अनुभव आहे. तेव्हां ही गोष्ट होणें नाही.

**धर्म**—तर मग मोठीच पचाईत ! आपण येतहि नाहीं ह्मणतां आणि नावहि सांगत नाहीं ! राजवाड्यांत गेल्यावर श्रेष्ठ भीष्माचार्यांनी आज काय शिकलांत ह्मणून आह्मांला विचारिलें, ह्मणजे आजची सर्व हकीकत आह्माला सांगावी लागणार; आणि ती सांगतांना आह्मांला जर आपलें नाव सागतां आलें नाहीं, तर ते काय ह्मणतील आह्मांला ! अगोदर आपल्याला घेऊन न आल्याबद्दलच दोष देतील ते मला. ह्मणून ह्मणतो, कृपा करून आमच्याबरोबर चलावें.

**द्रोण**—शिव शिव ! राजदरबारीं अनाहूत कधींच जावयाचें नाहीं, हातर माझा अगदीं कृतनिश्चय होऊन चुकला आहे.

**धर्म**—पण मी आपल्याला विज्ञप्ति करतोंना ? मी राजपुत्र आहें.

**द्रोण**—हो, तू राजपुत्र आहेस, ह्मणूनच मला तुझ्या आमंत्रणावरून येतां येत नाहीं. राज्याधिकारावर असणाऱ्या योग्य पुरुषांकडून बोलावणें आल्यास मी येईन, न येण्याचा भाग नाहीं.

**धर्म**—तर मग, भीष्माचार्यांकडूनच आपल्यास बोलावणें येईल. पण 'आपलें नांव काय ?' ह्मणून त्यांनीं विचारिलें, तर त्यांनां काय सांगूं मी ?

**द्रोण**—असा असा एक ब्राह्मण आला होता आणि त्यानें असा असा चमत्कार करून दाखविला, म्हणून सांग म्हणजे झालें. एवढ्यावरूनच त्या श्रेष्ठ प्रतापी भीष्माचार्यांना माझी ओळख पटेल. यापेक्षां जास्त ओळख पटवावयास नको.

**धर्म**—ठीक आहे, जशी आचार्यांची आज्ञा. बरें, येतोंतर आम्ही. ( परतून येऊन ) बरें, पण आपण उतरलांत कुठें, एवढेंतरी कृपा करून सांगावें ?

**द्रोण**—( हंसून ) हो, एवढें न सांगायला काय झालें ? त्या तुमच्या क्रीडोद्यानाच्या पलीकडे तें देवालय दिसतें आहे कीं नाहीं, त्याच्या एका ओरींत उतरलों आहों आम्ही.

**धर्म**—बरें तर, येतों. आचार्यांनां अभिवंदन करितों.

**सर्व**—( द्रोणास ) अभिवंदन करतों.

**द्रोण**—कल्याण असो.

[ भीम व अर्जुनाशिवाय सर्व जातात.

**भीम**—अर्जुना, सगळे चालले आणि तू कां असा मागसलास ? काय, आहे काय तुझ्या मनांत ? मीं ओळखलें आहे, खरें सांग.

**अर्जुन**—अरे दुसरें काय असणार ! माझ्या मनांत कूपांत बाण टाकून ते परत येतात कीं नाहींत तें पहावयाचें आहे. पण तें साध्य होणें शक्य दिसत नाहीं. मन्त्राशिवाय ही विद्या साध्य होणें दुर्घट दिसतें; आणि एवढ्याचकरितां—तुझ्यापासून कशाला चोरून ठेवूं—त्या आचार्यांनां गांठून यांच्याकडून आपण ही अस्त्रविद्या संपादन करावी, असें वाटतें मला. म्हणून हे जिकडे उतरले आहेत तिकडे यांच्या मागून जावें म्हणतों. थांब, त्यांनां जाऊं दे पुढें, आपण त्या तळ्यांतील सुसरींची शिकार करून त्या देवळाकडे हळूच त्यांच्या मागोमाग जाऊं.

[ कूपाचे कांठीं तीर टाकीत उभे रहातात.

**द्रोण**—( स्वगत ) राजपुत्रांनां मी मूठभर ईषिका सोडून आणि बाण टाकून जो चमत्कार दाखविला, त्याचें इष्टकार्य हें झालेंच पाहिजे ! भरतकुलावतंस गांगेय भीष्माचार्यांच्या दर्शनाचा योग जुळून आल्याशिवाय माझे ईप्सित मनोरथ फलद्रूप कसे होणार ! या कुरुनंदनांच्या शिक्षेचें काम माझे हातीं आलें, म्हणजे त्यांनां अमोघ अस्त्रविद्येचें दान करून त्यांच्याच हातानें त्या धुंद द्रुपदराजाच्या कुमित्रत्वाचा आणि ऐश्वर्यमदाचा छेद करून त्याची धुंदी उतरीन. सध्या माझा कोपानळ असाच अप्रकट राहून यथेष्ट धुमसूं दे ! म्हणजे शेवटीं त्यांच्याच एका दिव्य शिकवणीनें त्या नराधम दुष्ट द्रुपदाला करपवून टाकतां येईल ! ब्राह्मणाचा

अवमान ! माझी ब्राह्मणाचा अवमान !! क्षात्रयशाचा अंगीकार करणाऱ्या माझा ब्राह्मणाचा अवमान !!! ह्मणजे काय ! एखादी यःकश्चित् क्षुद्र गोष्ट आहे ! आणि तीहि प्रथमतः विश्वास दाखवून मागून वचनभंग करून !! या वचनभंगानें आणि विश्वासघातानें किती राजे—आपल्यास चक्रवर्ती ह्मणवणारे राजे—आजपर्यंत रसातळाला गेले आहेत, याची, अधिकारानें आणि ऐश्वर्यानें धुंदी चढून अंध झालेल्या राजांनां प्रथमतः यत्किंचितहि कल्पना नसते. पण तेंच मागून त्यास एखादें तीव्र अंजन मिळालें, कीं त्यांची ही धुंदी तेव्हांच उतरते. पण मग काय त्याचा उपयोग ! पश्चाद्बुद्धि कधीहि उपयोगीं पडत नसते.

[ जातात

---

## प्रवेश २ रा.

[स्थळ—राजवाडा. भीष्माचार्यांचे शयनमंदिर.
एक दूत व भीष्माचार्य शयनमंदिरात आहेत.]

**दूत**—( बाहेर येऊन ) हे परिचारक हो ! कुरु-कुल-श्रेष्ठ भीष्माचार्य विश्रांती घेण्याकरितां शयनमंदिरांत गेले आहेत, तर कृपा करून येथे गलबला करू नका.

**भीष्माचार्य**—(स्वगत) अर्जुन नेहमीनेहेमी जे खुबीदार प्रश्न करितो, ते त्याच्या तीव्र बुद्धीचे दर्शक आहेत. शस्त्रास्त्रविद्येंत पंडुपुत्रांनी आणि धृतराष्ट्रपुत्रांनी किती प्रावीण्य संपादिलें आहे, तें पडताळून पहाते वेळीच माझ्या प्रत्ययास येऊन चुकलें कीं, या प्रज्ञावान् शिष्यांची जिज्ञासा कृपाचार्यांसारख्या केवळ शस्त्रविद्येतच निपुण असणाऱ्या एकदेशीय गुरूकडून कशी तृप्त व्हावी ? आणि गुरुच जर अल्पबुद्धी, साधारण धारणाशक्तीचा आणि कोत्या मनाचा असेल तर जिज्ञासू, विचारी, कुशाग्रबुद्धी अशा शिष्यांचें समाधान त्याच्याकडून व्हावें कसें ! भक्कम भोजन करणाराला एखाद्या कृपण हाताच्या मनुष्यानें वाढावें आणि तो जसा अतृप्त रहावा; अथवा एखाद्या तेल्याच्या बैलाचे डोळे बांधून त्याला जशा घाण्याच्या भोंवतीं घिरट्या घालावयास लावावें, त्याला तेल काढावयाचें अथवा पेंड काढावयाची हें कांहींच कळू नये; अथवा एखाद्या मुक्यानें एखाद्या बृहस्पतीसारख्या वाचाळ मुलास बोलावयास शिकवावें; किंवा एखाद्या जन्मबधिरानें दुसऱ्यास गायनविद्या शिकवूं लागावें, किंवा जन्मांधानें एखाद्या डोळसास प्रकाशासंबंधानें व्याख्यान देऊं लागावें, अथवा एखाद्या पाखंड्यानें भगवद्भक्तांस परमेश्वराची ओळख करून देण्याचा प्रयत्न करावा, तद्वतच सध्याचा प्रकार होत आहे. माझ्या नातवांच्या या अशा बाळपणांत

जर क्षत्रियकुलोत्पन्न भरतवंशीय वीरांनां योग्य असें शिक्षण मिळालें नाहीं, तर त्यांच्या हातून हा चक्रवर्तित्वाचा भार कसा निभावेल? तेव्हां यांनां भार्गवासारख्या अथवा द्रोणाचार्यांसारख्या कुशाग्र बुद्धीच्या प्रतापी आणि महा तेजस्वी अशा गुरूंच्या शिक्षेखालींच ठेविलें पाहिजे. त्याशिवाय यांनां योग्य दिशा मिळून यांचा हवा तसा 'अभ्यास होणार नाहीं. धर्मार्जुनांनीं ज्यांच्या अस्त्रविद्येच्या आणि धनुर्विद्येच्या संबधानें मघांशीं मला अत्यंत अपूर्व असे जे चमत्कार सांगितले, ते भार्गवाच्या ठिकाणीं अथवा द्रोणाचार्यांच्या ठिकाणींच संभवतात. अर्जुनानें जें त्या पुरुषाचे वर्णन केलें, त्यावरून ते बहुधा द्रोणाचार्यच असावे. भार्गवराम असतीलसें वाटत नाहीं. कारण ज्यानें आपल्या बाहुबलानें सर्व क्षत्रियांनां जिंकून मिळविलेली यच्चावत् सर्व संपत्ती ब्राह्मणांनां दान देऊन त्यांनां सधन करून सोडिलें, त्याच्या तोंडून 'मला ब्राह्मणाला भोजन द्या, ह्मणजे झालें,' हे शब्द निघतील, हें सहसा संभवत नाहीं. हे द्रोणाचार्य असले, तर बरेंच झालें; नसले, तरीहि यांच्या गुणांवरून हे मुलांच्या शिक्षेला योग्य असे दिसतात. तेव्हां कांहीं कालतरी यांच्या हातीं मुलांनां देण्यास हरकत नाहीं. नगराबाहेरील शिवमंदिराकडे शिबिका घेऊन जाऊन त्यांनां योग्य सन्मानपूर्वक आणण्याविषयीं प्रधानांस मीं सांगितलें होतें, त्याप्रमाणें ते आणखी घटका दोन घटकांनीं त्यांनां घेऊन येतील, तोपर्यंत आपण जरा विश्रांती घ्यावी. [ निजतात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थल—राजवाड्यांतील एक दालन. उपहाराचें साहित्य उशाशीं घेऊन बल्लव निजला आहे इतक्यांत शकुनी व दुःशासन येतात ]

**दुःशासन**—मामा, हा पहा पांडवांचा बल्लव इथें येऊन कसा अजगरासारखा पडला आहे! जिथें पडेल तिथें बेट्याला झोंप! याला वेळ नाहीं स्थळ नाहीं! थांबा, याची जरा गमत करूं. आपण याचे हातपाय बांधूं. मीं हात बांधतों आणि तुह्मी पाय बांधा. मात्र हळू—अगदीं हळू हां, नाहींतर जागा होईल तो.

( दुःशासन बल्लवाचे हात बांधतो आहे आणि शकुनीमामा पाय बांधित आहेत, इतक्यांत धर्मभीमादि पांडव येतात. )

**भीम**—हा काय प्रकार! इथें कोण पडला आहे असा? अरे, हातर आमचा बल्लव! मामासाहेब, तुह्मी याचे हे पायसे बांधतां? (अर्जुनास) इर्जान, हि दिरश सिन्न शिकाव फिरे मिजाल ह्हात्त! (अर्जुना, हे दुःशासन शकुनी फार माजले आहेत.)

**बल्लव**—(शकुनीच्या हिसक्यामुळें घाबरून ओरडत उठून) अरे मेलों मेलों मेलों, धावा धावा—

**अर्जुन**—खुद्द राजवाड्यांत आणि ही अशी भलतीच थट्टा!

**भीम**—आणि आमच्या बल्लवाची!

**धर्म**—राजकुलोत्पन्न पुरुषांनां हलक्या दरजाच्या आश्रितांची अशी थट्टा करणें उचित नाहीं.

**शकुनी**—हे धर्म आले सांगायला! कुणीं केली आहे इथें याची थट्टा? ह्याच्या या उद्धट वर्तनाबद्दल आह्मीं याला ही शिक्षा केली आहे. भर दिवसाढवळ्या याच्या-माराव्या शागिर्दानें राजवाड्यांतल्या दालनांत येऊन आषपणानें निजावें, हें किती अचरटपणाचें आणि उद्धटपणाचें वर्तन! तेव्हां याला शिक्षा नको काय?

**भीम**—आमच्या नोकरमाणसांची अशी थट्टा करण्याचा अथवा त्याला शिक्षा करण्याचा तुह्मांला काय अधिकार?

**दुःशासन**—हंः, आमच्या वाड्यांत आह्मांला अधिकार? (हंसून फळें खात खात) आपणहि असे अजगरासारखे पडलां असतां तर आपलीहि अशीच गठडी वळली असती. आह्मांला अधिकार ह्मणे! आणि हे अकलेचे खंदक धर्म धर्म सांगतात!!

**भीम**—माझ्या तोंडावर माझ्या धर्मरायाला हे शब्द! अन् तू माझी गठडी वळणार? हंः (त्याची मानगोटी धरून) मूर्खा! पुनः उच्चारशील असे शब्द?

**अर्जुन**—अरेरे, आचार्यांच्या भेटीकरितां ह्मणून आह्मीं बल्लवाबरोबर पाठविलेलीं फळें यानें उष्टीं केलीं! याबद्दल याला योग्य शासन केलें पाहिजे.

**भीम**—तें करण्याचें माझें काम! तर ह्याला या फळांबरोबरच ह्याच्या या कृतकर्मांचीं फळेंहि चारतों. (त्याचे पाठींत बुक्के मारित) खा, खा—

(इतक्यांत प्रधान द्रोणाचार्यांस घेऊन आल्याची दूत वर्दी घेऊन येतो.)

**धर्म**—शुः, आचार्यांची स्वारी आली! भीमा, सोड सोड त्याला; अशा वेळीं भलताच प्रकार योग्य नव्हे.

(भीम त्यास सोडतो. इतक्यांत प्रधान द्रोणाचार्यांसह प्रवेश करतात.)

**धर्म व इतर**—(प्रणाम करून) आचार्यांस अभिवंदन करितों.

**द्रोण**—कल्याण असो.

(इतक्यांत भीष्माचार्य बाहेर येतात.)

**भीष्म**—(स्वगत) हेतर विप्रश्रेष्ठ द्रोणाचार्य! (उघड) आचार्य, ओः हो, फार दिवसांनीं भेटलांत. भेटा पाहूं एकदा मला. (त्यांस आलिंगन देतात.) आपल्या

आगमनानें आमचा राजहर्म्य आणि आमची नगरी आज आपण पावन केलीत. (द्रोणास आसनावर बसवून अर्घ्यपाद्य देतात.) माझ्या भगिनी शारद्वतीचें आपण पाणिग्रहण केलेंत त्या वेळीं काय ती आपली भेट, त्यापुढें भेट नाहीं. त्यानंतर आजवर समर्थांचा मी नुसता लौकिकच ऐकत होतों. आज आमचें महत्पुण्यच कीं, आह्मांला प्रत्यक्ष आपला दर्शनलाभ झाला. हस्तिनापुरीं मुद्दामच यावयाचें, किंवा पुढें कुठें जावयाचें आहे, आणि ह्मणूनच आह्मांला आजचा हा सहज सुदिन दाखविलात?

**द्रोण**—पुढें कुठें जावयाचें नाहीं. आपला लौकिक ऐकून मुद्दामच इथें आलों. माझा इथें येण्याचा उद्देश सांगण्यापूर्वी आपल्याला इकडे येण्याची थोडीशी कारण-परंपरा निवेदन केली पाहिजे, आणि ती एकांतांतच.

**भीष्म**—(प्रधानास) प्रधानजी, कुमारांसह तुह्मी उपसभागृहांत जाऊन बसा. कारणपरत्वें मी तुह्मांस बोलावणें पाठवीन. (द्रोणाचार्यांस) महाभागांनीं ती कथन करावी. [ प्रधान राजपुत्रांसह जातात.

**द्रोण**—ठीक आहे. कुरुश्रेष्ठांचें अवधान असावें. धनुर्वेद व अस्त्रविद्या यांचें अध्ययन करण्याकरितां मी अग्निवेश महर्षींकडे होतों. त्याच वेळीं पंचाळदेशचा वीर्यशाली राजपुत्र यज्ञसेन द्रुपद हाहि तिथें होता. आह्मी उभयतां गुरुबंधु असल्यामुळें व एकाच गुरुपाशीं पुष्कळ वर्षेपर्यंत विद्याभ्यासास असल्यामुळें एकमेकांस अत्यंत प्रिय झालों. पुढें द्रुपदाचे वडील पृषदराय आसन्नमरण झाल्यामुळें तो आपल्या राजधानीस निघून गेला व त्याचे हातीं राज्यकारभारहि आला. जातांना अर्थात मित्रभावानें त्याचा मीं योग्य तो सत्कार केला होता व त्या वेळीं त्यानेंहि 'आपण राज्यारूढ झालों ह्मणजे आपलें अर्धराज्य तुझेंच आहे असें निश्चयानें समज, यांत यत्किंचितहि अंतर होणार नाहीं,' असें मला वचनपूर्वक आश्वासन दिलें होतें. त्यापुढें कृपाचार्यांच्या कनिष्ठ भगिनीचें मीं पाणिग्रहण केलें, तें आपल्यास विदित आहेच. पुढें तिच्यापासून मला एकच एक पुत्र झाला. तो श्रीमंतांचीं मुलें दूध पितांना पाहून तोहि दूध मागूं लागला; पण मी गरीब ब्राह्मण, मजजवळ धेनू कुठली? एखाद्या सधन ब्राह्मणापासून धर्मोपेत अशा शुद्ध प्रतिग्रहानें आपल्यास एखादी दुभती धेनू मिळावी, ह्मणून मी पुष्कळ हिंडलों. पण ती मला प्राप्त झाली नाहीं. इकडे पुत्र दुधाबद्दल हट्ट करी, ह्मणून घरांत शारद्वतीनें पिठांत पाणी घालून तें दुग्धतुल्य करून त्यास द्यावें व तें पिऊन त्यानेंहि आनंदानें नाचावें. (डोळ्यांस पाणी येतें.) हे कुरुश्रेष्ठ गंगानंदना! हा प्रकार मीं जेव्हां प्रत्यक्ष पाहिला,

तेव्हां मला अत्यंत भडभडून आलें आणि पुत्रस्नेहामुळें मोह पावून धनप्राप्त्यर्थ पापिष्ठ अशी जी परसेवा ती न करण्याचा माझा निश्चय डळमळला व मी मोठ्या उत्सुकतेनें माझ्या गुरुबंधु द्रुपदाच्यापाशीं गेलों आणि गुरुबंधुत्वाच्या नात्यानें आणि त्यानें पूर्वी दिलेलें वचन मनांत आणून त्याच्याशीं प्रेमळ अंतः-करणानें बोलूं लागलों. परंतु तिथें त्याच्याकडून राजमदामुळें व ऐश्वर्याच्या धुंदीमुळें माझें स्वागततर नाहींच, पण उलट उपहास मात्र झाला! तो मला जे जे शब्द बोलला, ते माझ्यानें सांगवत नाहींत, माझा कंठ भरून येतो. माझ्यासारख्या निर्धन ब्राह्मणानें त्याच्याशीं सलगी दाखविली, हें त्यास बहुधा रुचलें नसावें आणि ह्मणूनच त्यानें बुद्धिपूर्वक माझा असा अपमान केला; परंतु तो मला सहन कसा व्हावा? आणि ह्मणूनच त्याच्या नगरींत त्यापुढें एक निमिषहि न रहातां क्रोधानें अत्यंत संतप्त होऊन भयंकर प्रतिज्ञा करून मी इथें प्रतापी, तेजस्वी आणि गुणी शिष्य मिळतील अशा आशेनें इकडे निघून आलों. हे कुरुश्रेष्ठ! आतां यापुढें मीं काय करावें, तें आपणच सांगा.

**भीष्म**—(स्वगत) हे ज्याअर्थी अशी प्रतिज्ञा करून आले आहेत, त्याअर्थी मुलांनां हे निःसंशय आस्थेनें शिकवितील. कृपाचार्य शस्त्रविद्येंत चांगले निपुण आहेत; ते शस्त्रविद्या शिकवितील आणि हे धनुर्विद्या व अस्त्रविद्या शिकवितील. (उघड) आचार्य! आपण यापुढें कष्टी होण्याचें कारण नाहीं. यज्ञसेन द्रुपद दुर्दैवी, ह्मणूनच अशा रत्नाची त्याला किंमत कळली नाहीं. हे विप्रश्रेष्ठ! तुह्मी आपल्या धनुष्याची प्रत्यंचा उतरा आणि या राजपुत्रांनां अस्त्रविद्येंत पारंगत करा. आपण इकडे आलांत, हा आमच्यावर आपला मोठाच अनुग्रह होय. कुरूंचें सर्व वित्त सर्व राज्य आणि दुसरेंहि जें जें सर्व आहे, तें सारें आपलें आहे. आपण त्याचे स्वामी आहां आणि कुरुकुलोत्पन्न सर्व पुरुष आपले दास आहेत, असें समजा. आणि या सर्वांचा प्रेमपूर्वक स्वीकार करून आपली प्रतिज्ञा शेवटास न्या. (दूताकडे वळून) दूता! प्रधानास आणि राजकुमारांस हाक मार. (द्रोणाचार्यांस) आचार्य, शारद्वती आणि आपले चिरंजीव कुठें आहेत?

**द्रोण**—तीं शिवमंदिरांतच आहेत. त्यांनांहि मी आपल्याबरोबरच घेऊन आलों आहें.

**भीष्म**—मग ठीक आहे. (इतक्यांत प्रधान व राजकुमार येतात.) सुमंत! नगराबाहेरील—हे उतरले आहेत त्या—शिवमंदिराच्या पूर्वेचा पंडुप्रासाद योग्य प्रकारचें साहित्य करून यांनां रहावयास द्या व तिथें योग्य ते दासदासी आणि सेवक

यांच्या तैनातीला ठेवून द्या. त्याचप्रमाणें सहस्र धेनूंचें एक खिल्लार अशीं दोन खिल्लारें एक यांच्या मुलाकरितां ह्मणजे आमच्या भाच्याकरितां आणि एक यांच्याकरितां, यांच्या वाड्यासन्निधच एक गोशाला निर्मून तिथें ठेवून द्या आणि त्यांच्या रक्षणार्थ योग्य ती शिबंदी नेमा. हवे तितके रथ, कुंजर आणि अश्व यांच्या तैनातींत ठेवून द्या. ( द्रोणाचार्यांची पूजा करून त्यांस गृहदान करतात व वस्त्रें भूषणें देतात. ) आचार्य! असें अमूल्य गुणनिधान हातीं लागण्याकरितां शहाणे पुरुष आपलें जीवित अर्पण करतील, मग त्यापुढें नश्वर धनाची अथवा राज्याची किंमत काय! आह्मी अंध आहोंत. आह्मांला हातीं धरून धर्मपथ दाखवा. या कुरुवंशीयांचें दारिद्र्य दूर करून आपणच आपल्या विद्याधनानें त्यांनां सधन आणि सनाथ करा. यापुढें भीष्म आणि द्रोण हे काहीं वेगळे नाहींत. आपली व माझी जोडी आतां आपलें आयुष्य संपेपर्यंत राहील, यांत एक लेशभरहि अंतर पडणार नाहीं. यापेक्षां जास्त काय सांगूं? ( सर्व कुरुनंदनांस त्यांचे हातीं देऊन ) आचार्य! आजपासून हे सर्व कुरुनंदन आपले शिष्य झाले. यापुढें त्यांच्या शिक्षणाची मला काळजी करण्याचें कारण नाहीं. हीं आपलींच मुलें आहेत असें समजून यांचा अंगीकार करा. हे धर्म, हे दुर्योधनादिकहो! आचार्यांस प्रणाम करा. आजपासून हे तुमचे गुरु.

**द्रोण**—(नेत्रांस पाणी आणून) हे कुरुश्रेष्ठ गांगेय! आपण दिलेल्या बहुमानाला जरी मी सर्वस्वी पात्र नाहीं, तरी आपण दिलेल्या शिष्यांचा मी प्रेमपूर्वक अंगीकार करतों. आणि यांनां थोड्याच कालांत धनुर्विद्येंत व अस्त्रविद्येत प्रवीण करून सोडतों. त्याबद्दल आपल्यास आतां चिंता नसावी.

**भीष्म**—आतां कशास मी चिंता करूं? आपल्यासारखे गुरु मिळाल्याचें ऐकून राजा धृतराष्ट्राला आनंद होईल. माझ्या मनांतून आपल्याला त्यांच्या भेटीस न्यावें असें आहे. मग जशी आपली इच्छा.

**द्रोण**—ठीक आहे, माझ्यावर हा आपला अनुग्रहच होत आहे.

**भीष्म**—चलावें तर, त्यांनां भेट आणि मग जमल्यास मीच आपल्याबरोबर पडुप्रासादापर्यंत येतों. प्रधानजी! तोंपर्यंत आर्या शारद्वतीला दासदासी वगैरे पाठवून सहकुमार पडुप्रासादाकडे घेऊन जाण्याची व्यवस्था करा. ती मला भेटल्याला फार काल लोटला. चला आचार्य, आपणहि जाऊं. [ सर्व जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थल–पंडुप्रासाद. अश्वत्थामा, कृपी प्रवेश करितात.
एकीकडून कृपाचार्यांसह द्रोण येऊन आड उभे आहेत. ]

**द्रोण**—( कृपाचार्यांस ) थांबा इथेंच आड उभे रहा, ह्मणजे ह्या नव्या वैभवाबरोबर आनंदानेंहि इथं कसा प्रवेश केला आहे, हेंहि आपल्यास पहावयास मिळेल !

**अश्वत्थामा**—आई, मला रोजच्यासारखं द्रोणांतूनच दूध दे तूं आपली. ह्या असल्या पांढऱ्या आणि पिवळ्या पेल्यांतून घेऊ नयेना दूध आपण ब्राह्मणांनीं ?

**कृपाचार्य**—( द्रोणाचार्यांस ) ह्मणजे ?

**द्रोण**—ह्मणजे काय तें आतां समजेलच !

**कृपी**—बाळा, हीं पात्रें कुणाचीं उष्टीं नाहींत. यांतून घ्यायला कांहीं हरकत नाहीं. हीं इथल्या राजानं आपल्याला दान केली आहेत. तेव्हां आतां यांतून घ्यायला कांहीं हरकत नाहीं बरं बाळ! घे, घे हें.

**द्रोण**—( कृपाचार्यांस ) रुप्याच्या आणि सुवर्णाच्या पात्रांतून ब्राह्मणांनीं दूध पिऊं नये, ह्मणून याला पूर्वी ही सांगत होती, ती आज त्याच्या उलट सांगत आहे. स्थित्यंतरामुळें मनुष्याच्या वचनांतहि असा फरक पडतो !

**अश्वत्थामा**—( पेला घेऊन ) आई, तूं घे ह्मणतेस ह्मणून मी घेतों ह्या पेल्यांतून, पण मग मी ब्राह्मण नाहीं असं नाहीं ना होणार ?

**द्रोण**—( हसतात ) अरे, पेल्यांतून दूध घेतल्यानें कुठें ब्राह्मण्य नाहींसें होतें ?

**कृपी**—छेः छेः, तसली वेडी कल्पना तूं मनांतहि आणूं नकोस ! हं, घे हें दूध. ( स्वगत ) याला मी हें दूध देत आहें, पण याला या दुधाची गोडी कळली ह्मणजे पिठवणी ह्मणून जें दूध याला मी आजपर्यंत देत होतें, तें खरें नव्हतें, असें हा तेव्हांच ओळखील.

**अश्वत्थामा**—( दूध पिऊन ) आई, त्या दुधाहून हें दूध कितीतरी गोड लागतं ग ? या पात्रांतून घेतल्यामुळंच हें इतकं गोड लागत असेल, नाहीं ?

**कृपी**—छेः छेः बाळा ! पात्रांतून दूध घेतल्यामुळ त्याची रुची बदलते थोडीच ! अरे, त्या वेळेस आपण दरिद्री होतों, तुला दूध द्यायला आपल्याकडे एकहि गाय नव्हती, आणि ह्मणून मी तुला पाण्यांत पीठ कालवून तेंच दूध ह्मणून देत असे.

**कृपाचार्य**—आचार्य ! कायहो हें ? आणि तुह्मीं एका शब्दानेंतरी मला—

**द्रोण**—ऐका, ती काय म्हणते हें.

**अश्वत्थामा**—तर मग तूं मला लट्पटीचं दूध देऊन फसवित होतीस तेव्हां?

**कृपी**—मी कसली फसवित होतें, आमचें दारिद्र्य फसवित होतं बाळा तुला! ( डोळे भरून येतात व ती त्यास पुढें ओढून स्वताचे डोळे पुसते. )

**कृपाचार्य**—( द्रोणाचार्यांस ) आचार्य! आपल्या आश्रमांत धेनू नसल्याचं मला कळवितेत, तर मीं एक सोडून दहा धेनू पाठवून दिल्या असत्या.

**द्रोण**—आचार्य, आपण दारिद्र्यामध्यें असतांना आपल्यासारख्या आप्तांनां निरर्थक संकटांत घालणें इष्ट नव्हे, एवढ्याचकरितां मीं आपल्यास ही गोष्ट कळविली नाहीं.

**कृपाचार्य**—अहो, आपत्कालीं अथवा संकटकालीं जर उपयोगीं पडणार नाहींत, तर मग ते आप्त कसले!

**अश्वत्थामा**—आई, रडतेस कां ग तूं अशी?

**कृपी**—नाहीं, रडत नाहीं बाळा मी! (डोळे पुसते.) पूर्वीच्या दारिद्र्याच्या आठवणीनं हें रडं आपोआप येतं; आजपासून नाहीं हां माझ्या बाळाला फसविणार मी!

**अश्वत्थामा**—पण आई, हें दारिद्र्य पुनः येणार नाहीं म्हणून कशावरून? मला तूं आपलं पूर्वीच्यासारखं तें लट्पटीचच दूध दे!

**कृपी**—छेः बाळा, असं बोलू नकोस.

**कृपाचार्य**—( पुढें होऊन त्याला आपल्या हृदयाशीं धरून ) नाहीं बाळा! तें दारिद्र्य आतां पुनः खास येणार नाहीं!

**कृपी**—कोण? दादा! मी नमस्कार करतें.

**कृपाचार्य**—सौभाग्यवती भव! ताई, एकून तुमच्यावर फारच संकटं आलीं तर!

**अश्वत्थामा**—आई, हा कोण ग?

**कृपी**—बाळा, हा मामा तुझा. त्याला नमस्कार कर.

**द्रोण**—( पुढें होऊन ) अश्वत्था! ही धनुर्विद्या शिकविण्याचं जोंपर्यंत मला सामर्थ्य आहे, तोपर्यंततरी तें दारिद्र्य खास नाहीं यायचें!

**अश्वत्थामा**—तर मग मी ह्या पेल्यांतून हें खरं दूधच पित जाईन हां आई. तूं मात्र आतां रडूं नकोस अशी पूर्वीच्यासारखी.

**कृपी**—बाळा, त्या वेळचं रडं दुःखाचं असे आणि आतां त्यांत आनंदाचं मिश्रण झालं आहे.

**अश्वत्थामा**—मामा, तुह्मी इथल्या राजकुमारांनां तरवारीचे हात करायला शिकवितांना ? आई सगळं सांगत होती मला ! मला शिकवाल काहो ?

**कृपाचार्य**—होहो, शिकवीन बरें माझ्या बाळाला ! चल मजबरोबर. ताई, मी याला घेऊन जातों. आज हा आमच्या इकडेच राहील.

**कृपी**—बरं ये.

[ कृपाचार्य अश्वत्थाम्यासह जातात.

**द्रोण**—' दारिद्र्य पुनः येणार नाहीं ह्मणून कशावरून ?' हेच त्याचे शब्द होते नाहीं ? खरेंच, वैभव आणि दारिद्र्य हीं केव्हां येतील आणि केव्हां जातील, हें कांहीं मनुष्याला सांगतां येणार नाहीं ! मग एक आल्याचा मनुष्यानें आनंद कां मानावा आणि दुसरें आल्याबद्दल खेद कां मानावा ? या सुखदुःखाच्या कल्पना केवळ भासमय आहेत. कारण, मनुष्य ह्या कल्पना दोन पदार्थांच्या तारतम्याच्या भावापासून आधीं निर्माण करतो, आणि त्यांजबरोबरच तो या दुःखालाहि जन्म देतो. असें नसतें, तर हें सर्व जग यच्चावत् मनुष्यांनां सारखेंच सुखमय झालें असतें. ती पिठवणी आणि हें दूध, ह्यांमधील अंतर याला जोंपर्यंत कळलें नव्हतें. तोंपर्यंत हा किती सुखी व आनंदी होता ! तेंच याला खऱ्या दुधाची रुची कळल्याबरोबर ती पिठवणी खोटें दूध झालें, आणि तिच्यापेक्षां दुधाची गोडी विशेष आहे. असें याला कळून चुकलें. खऱ्या दुधाच्या अभावीं ती पिठवणीच याला हेंच सुख व हाच आनंद देत होती. पण हें खरें दूध मिळतांच तो पूर्वीचा आनंद आणि तें सुख पालटून जाऊन तेंच दुःखमय झालें व हें नवें स्थित्यंतर सुखदायी आणि आनंदप्रद झालें. तेव्हां हा सारा प्रभाव कशाचा ! मनुष्यांची कल्पनासृष्टी आणि तारतम्यभावाची दृष्टी या दोहींचा. याशिवाय दुसरें आहे काय इथें ! पण हें सर्व समजून मनुष्य पुनः या सुखदुःखाच्या भावनेंतच गुरफटून जाऊन स्त्रीमोहांत व पुत्रस्नेहांत गुतून पडतो. या नव्या वैभवानें माझ्या पुत्राचे दुधाचे पांग फिटले, ही गोष्ट खरी आहे; पण त्या नराधम द्रुपदाच्या अपमानकारक शब्दांनीं माझ्या हृदयांत जें भयंकर शल्य केलें आहे, तें कुठें अद्याप भरून आलें आहे ? तें भरून काढण्याकरितांतर मी इथवर आलों आणि तें कसें विसरेन ? या वैभवानें बाह्य शांतता उत्पन्न होईल. पण अंतःकरणांत पेटलेल्या क्रोधाग्नीच्या ज्वालांचें शमन कसें होईल ! [ जातात.

**[ पडदा पडतो. ]**

## अंक २ रा.

### प्रवेश १ ला.

[ स्थळ—हस्तिनापुराबाहेरील क्रीडाभूमी. दुर्योधनादि कौरव, शकुनी, कर्ण व धर्मभीमादि पांडव प्रवेश करितात. ]

**द्रोण**—हे कुरुनंदन हो ! कूपांत पडलेली वस्तु बाण टाकून कशी बाहेर काढावयाची ती विद्या मीं तुह्मांला शिकविली. तींत कांहींच अर्थ नाहीं. ही धनुर्वेद-विद्या आणि तशीच ती अस्त्रविद्या या दोन्हीहि फार गहन आहेत. त्याच्या लक्ष्यपूर्वक अभ्यासानें यापेक्षांहि अपूर्व असे चमत्कार करितां येतील. पण ही विद्या केवळ चमत्कार करण्याकरितां शिकावयाची नाहीं ! तुह्मी राजकुमार आहांत, राज्य-रक्षणाकरितां व राज्याला उत्पन्न होणाऱ्या शत्रूंचें दमन करण्याकरितां या विद्येचा तुह्मांला आस्थेनें अभ्यास केला पाहिजे; यांत जसजसें तुह्मी नैपुण्य मिळवाल, तसतसें ऐश्वर्य, कीर्ती आणि लौकिक हीं तुह्मांला प्राप्त होतील. तुह्मी उत्सुकतेनें आणि आस्थेनें शिकाल, तर मलाहि शिकविण्यास जास्त उत्साह येईल.

**सर्व**—हो हो, आह्मी मोठ्या उत्सुकतेनें आणि आस्थेनें अभ्यास करूं !

**द्रोण**—हे कुमार हो ! हा तुमचा उत्साह पाहून मला अत्यंत आनंद होत आहे व माझा उत्साहहि द्विगुणित होत आहे; पण तुह्मांला मला एक विचारायचें आहे.

**सर्व**—काय काय ? खुशाल विचारावें.

**द्रोण**—ऐका. तुह्मांला शिकविण्याचें पत्करण्यांत माझा एक विशेष हेतु आहे. माझ्या मनांत कांहींएक उद्दिष्ट कार्य उरकून टाकावयाचें अगदीं खिळून राहिलें आहे; आणि तुह्मी अस्त्रविद्येंत पारंगत झालां ह्मणजे तुह्मांलाच तें उरकलें पाहिजे. उरकाल कीं नाहीं, सांगा ? ( सर्व एकमेकांकडे पाहू लागतात. )

**दुर्योधन**—कसें काय कर्णा !

**कर्ण**—त्यांचें कार्यतरी कळूं दे अगोदर, ह्मणजे मग पहातां येईल !

**दुर्योधन**—आचार्यांनीं कृपा करून आपलें उद्दिष्ट कार्यतरी सांगावें.

**द्रोण**—कोणचेंहि महत्कार्य उरकण्यास हात घालण्यापूर्वी दीर्घकालापर्यंत त्याला वाच्यता देणें इष्ट नव्हे. कारण त्यायोगें त्याचा परिस्फोट होऊन कार्य नासतें. त्याच्या सिद्धीनेंच त्याला वाच्यता द्यावी, हें कुलीनांचें व कर्तृत्वी पुरुषांचें लक्षण आहे; आणि एवढ्याचकरितां माझें उद्दिष्ट कार्य तुह्मांला आजच सांगणें युक्त नाहीं. माझें उद्दिष्ट कार्य कोणच्याहि प्रकारचें असो, मी जें सांगेन तें कार्य

उरकण्याची ज्याच्यांत हिंमत आणि अवसान असेल, त्यानें ह्या अस्त्रास स्पर्श करून प्रतिज्ञा करावी. ( सर्व खालीं माना घालून स्तब्ध रहातात. )

**अर्जुन**—( पुढें होऊन गुरूस अभिवंदन करून ) या अस्त्रास कुणी स्पर्श करील ह्मणून इतका वेळ मी वाट पहात होतों. अजूनपर्यंत ज्याअर्थी कुणीहि पुढें होत नाहीं, त्याअर्थी गुरुजींनां आणि या पवित्र अस्त्राला प्रणाम करून मी हें वर उचलतों, आणि सर्वांसमक्ष अशी प्रतिज्ञा करितों कीं, आचार्य सांगतील तें कार्य कितीहि दुर्घट असो, स्वर्ग फोडून इंद्रादि देवांनां खालीं आणावयाचें असो, अथवा पाताळांत प्रवेश करून तेथून शेषाला धरून इथें आणावयाचें असो, गुरुजींच्या कृपाप्रसादानें आणि चरणकमलांच्या प्रतापानें मी तें पार पाडीन! मग त्यांत मला आपले प्राण वेंचावे लागले तरी मी त्याची पर्वा करणार नाहीं!

**कर्ण**—बोलणें सोपें असतें, पण करणें मात्र फार कठीण असतें! जगांत नुसती जीभ उचलून टाळ्याला लावणारे लोकच फार असायचे, मग हातून न कां होईना, बोलायला कां कमी करा! हें अस्त्र मीहि उचलणार होतों; परंतु ह्मटलें, व्यर्थ वाफ कां दवडा? आचार्यांचे उद्दिष्ट कार्य कोणतें तें कळलें ह्मणजे मुकाट्यानें करून दाखविलें ह्मणजे झालें.

**दुर्योधन**—उघडच आहे. अरे बोलेल तो करील काय आणि गर्जेल तो पडेल काय!

**भीम**—न गर्जना करितांच काय· दिवे लावतां तेंहि पाहूं!

**द्रोण**—( अर्जुनास हृदयाशीं घट्ट धरून व त्याचे मस्तक अवघ्राण करून ) साधु साधु! वत्सा अर्जुना! शाबास शाबास!! तुझ्या या उत्साहाच्या आणि वीरश्रीच्या भाषणानें मला अत्यानंद होत आहे, माझा कंठ भरून येतो आणि माझ्या या आनंदाश्रूंनीं मी तुला हें वीरस्नान घालतों! पुढेंमागें तूच माझें उद्दिष्ट कार्य उरकशील, अशी मला आशा वाटते. सध्याच्या तुझ्या ह्या वीरश्रीवरून मला असें वाटतें कीं, तू आपलें विजय हें नाम सर्वथा सार्थ करशील!

**अर्जुन**—आचार्यांच्या आशीर्वादानें काय होईल तें खरें, मी करणार कोण! गुरुवर्यांच्या चरणांची ही पवित्र धुळीच माझे हातून काय घडवील तें घडवील. काय घडेल तें मी तिचाच प्रताप समजेन.

**द्रोण**—वीरांचे ठिकाणीं विनय असल्यानें त्यांच्या इतर गुणांनां जास्तच शोभा येते!

**कर्ण**—पण व्यर्थ गर्वोक्ति वीरांनां निखालस कालिमा फांसते!

द्रोण—राधेया कर्णा ! अर्जुनाच्या वीरश्रीच्या भाषणास गर्वोक्ति ह्मणण्यांत तूं अत्यंत प्रमाद करीत आहेस! अरे, तूं ज्याला गर्वोक्ति ह्मणतोस, ते शब्द त्याचे उत्साहाचे द्योतक आहेत. जर मनांतच उत्साह नसेल, तर मग त्याला उद्गारतरी कुठून आणि कसा मिळेल ? उद्गार ह्मणजे अंतरंगांतील उत्साहाचे केवळ दर्शक आहेत. त्यांअर्थी अर्जुनाच्या उत्साहाच्या भाषणाला तूं गर्वोक्ति ह्मणूं नकोस.

दुर्योधन—आमचें तसें मुळींच ह्मणणें नाहीं! मनुष्यानें बोलल्याप्रमाणें कृती करून दाखविली, तर त्याच्या बोलण्याला गर्वोक्ति कोण ह्मणेल ?

भीम—हिह्ह ह्मिणाव्व चिराम्न,किस्त किर्र णिच्च किला ह्ह लिव्व किराम्न यिआह्ल, हिव्व इस्स लिस्स मिन्न बिलांत्त तिश्ताव्व किराम्न दिख्खाव्व किं? (हो हो ह्मणावें चोरांनो, कृती करण्याचा कालहि लौकरच येईल! हवी असल्यास मी न बोलतां ती आत्तांच करून दाखवू का ?)

अर्जुन—( भीमाचा हात दाबून ) हिह्ह भिम्म सिन्न, तिकीय्य ह्मिण्ण तिसाति खिश्शाह्ल ह्मिण्ण दित्त. गिर्र विरांच्च पिठु किह्ह भिलात्त प्रिकार्र किराण्ण इचात मिह्र ! ( हां हां भीमसेना, ते काय ह्मणतात तें खुशाल ह्मणूं देत. गुरुवर्यांच्या पुढें कांहीं भलता प्रकार करणें उचित नव्हे. )

द्रोण—अर्जुनासारख्या विनयसंपन्न कुमाराशीं हा असा मत्सर करणें चांगलें नव्हे. आपापसांत मत्सरबुद्धि असणें अगदींच अयुक्त. ती अत्यंत घातुक आणि नाश करणारी आहे. तेव्हां ती सोडून देऊन तुह्मी मोठ्या प्रेमभावानें व निष्कपट-पणानें रहा, ह्मणजे तुह्मी सर्व मिळून अखिल पृथ्वीला भारी व्हाल.

शकुनी—(दुर्योधनाचा हात दाबून हळूच) बस्स, आतां चप्प बसा. ( द्रोणाचा-र्याप्रत) आचार्यांची आज्ञा कोणास वंद्य होणार नाहीं ? होय कीं नाहीं दुर्योधना !

दुर्योधन—अलबत !

द्रोण—तर मग तुह्मी एकमेकांस प्रेमानें भेटा पाहूं ! दुर्योधना, तू भीमास भेट आणि कर्ण अर्जुनास भेट दे; आणि हे सौबला, तूं नकुळास भेट. (ते बाह्यात्कारें प्रेमानें भेटतात. )

द्रोण—( स्वगत ) भीमाला या चौघांनीं नदींत बुडविल्याची कृपाचार्यांनीं जी गोष्ट सांगितली, ती निःसंशय खरी असली पाहिजे. त्याशिवाय हा मत्सर आणि ही स्पर्धा संभवत नाहींत. असो, आपल्याला काय, ज्याच्या त्याच्या ग्राहकशक्ती-प्रमाणें त्याला विद्या देणें हें आपलें कर्तव्य आहे. ( उघड ) बाः, बाः, तुह्मी

प्रेमानें एकमेकांस भेटलांत, हें पाहून मला फार आनंद होत आहे. हे राजकुमार हो! धनुष्य, बाण आणि हीं आपलीं आयुधें घेऊन आज आमच्याच आश्रमाकडे चला आज तुमच्या उपहाराचा बेत तिकडेच करविला आहे. कारण उद्ईक प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वी मी तुह्मांला धनुर्विद्येतील एक नवीनच भाग शिकविणार आहें.

**सर्व**—ठीक आहे, जशी आचार्यांची आज्ञा. [सर्व जातात.

**द्रोण**—(जातांजातां स्वगत) गुरूंनीं शिष्यांची परीक्षा नाना प्रकारच्या युक्तींनी केली पाहिजे, आणि मग त्यांत ज्याची जशी ग्राहकशक्ति दिसेल त्याप्रमाणें त्याला विद्यादान केलें पाहिजे. एरवीं तें अपात्रीं होईल. आणि एवढ्याचकरितां आज मी ह्या सर्वांनां माझ्याच आश्रमांत उपहारार्थ ठेवून घेत आहें. ते उपहाराला बसले ह्मणजे तेथून सर्व दीप घेऊन जाण्यास बल्लवाला सांगितलेंच आहे. हे दीपप्रकाशाच्या अभावीं कसा काय उपहार करितात तें पाहू. ह्मणजे सहजच या सर्वांची परीक्षा होईल. यांच्यांत असलेली स्पर्धा कांहीं वाईट नाहीं. स्पर्धेनें मनुष्य चढाओढीनें शिकतें. पण यांच्यांत दिसून येणारी ही मत्सरबुद्धि मात्र कांहीं युक्त नव्हे. तिचा वेळींच बीमोड करणें हें आमच्यासारख्यांचें पवित्र कर्तव्यकर्म आहे [जातात

---

## प्रवेश २ रा.

[स्थल—पंडुप्रासाद. बल्लव दोन्ही हातांत
दोन दीप घेऊन प्रवेश करितो.]

**बल्लव**—आचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें राजकुमारांनां फराळाला बसवून मी तेथून सर्व दिवेतर हालविले. हेच शेवटचे दोन उरले होते, हेहि आतां विझवून टाकितों. पण राजकुमारांनां अंधारांत फराळाला बसविण्यांत आचार्यांचा काय बरें हेतु असावा! हरी जाणे, काय असेल तें असो. फराळाचें करून ठेवून मी किती वेळतरी वाट पहात बसलों. आज एवढें बरें आहे कीं, त्यांची सगळ्यांचीं ताटें गुरुजींच्या आज्ञेनुसार मीं एकदाच भक्कम वाढून ठेविलीं आहेत: आतां पुन्हा वाढण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. त्या भीमदादानें मात्र दोन ताटें आपल्या पुढें घेतलीं. सगळ्यांनां देऊन राहिलेलीं अजून तीनचार ताटें इथें शिल्लक आहेत. त्यांचा तिकडे फराळ होतो आहे तोंच आपणहि आपला इकडे उरकावा!

ह्मणजे पुढचें काम उरकून झटपट निजायला बरें. माझे डोळे केव्हांपासून पेंगायला लागले आहेत, तर आतां उगीच उशीर कां करावा ? ( एक दिवा मालवितो. ) ते एक अंधारांत फराळ करतात, ह्मणून आपण कां उगीच अंधारांत फराळ करा ? या फराळामुळें आपलें मात्र आज जेवण चुकलें. पण हीं तिन्ही ताटें रिकामीं केलीं ह्मणजे जेवणाचा बचपा निघेल! भीमसेनादाला दोन ताटें लागतात, तर मला तीन लागतात!! तेव्हां तो भीम तर मी बलभीम!!! (ताटें पुढें ओढून) हं बलभीमजी! चालूं द्या!! आतां मागेंपुढें पाहून काय उपयोग? (जांभई देतो.) ही जांभई कां आड येते आणखी! थांब बाई, जरा थांब; तूं कां मध्यें येतेस ? ही घे तुला आहुती! ( खातो ) वा:, आतां हिचें तोंडच बंद झालें!

**द्रोण**—( एका बाजूनें प्रवेश करून ) हा अचरटासारखा इथें कोण बरें बसला आहे ? अरे, हातर बल्लव! बिचाऱ्याला राजकुमारांचे उपहार होईपर्यंत देखील धीर निघेना वाटतें! असो, या वेळीं आपण पुढें जाऊं नये. बाजूला उभें राहूनच आंत काय चमत्कार होतो तें पहावें.

( आंतून—अरे बल्लवा! जरा दिवा आण बाबा, इथं कांहीं दिसत नाहीं. )

**बल्लव**—(स्वगत) हे दिवे मागतात, पण आचार्यांची आज्ञा कुठें आहे ?

( आंतून—अरे आणतोस कीं नाहीं ? )

**बल्लव**—आतां मात्र पंचाईत आली! (आपल्या पुढील दिवा मालवून चाहूल ऐकून) इकडे कुणाची बरें चाहूल झाली? तेव्हां आतां असें करून नाहीं उपयोगी. इथल्याच दिव्याला आपण मुकाट्यानें निरोप द्यावा, ह्मणजे झालें. आपण फराळ करतों हेंहि कुणी पहाणार नाहीं, आणि अंधारांत फराळ करण्याची कशी काय मजा असते, तेंहि समजेल आपल्याला. ( मोठ्यानें ) अहो, आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें इथले सगळे दिवे मालवून टाकले आहेत. दिवा आणण्याला आचार्यांची आज्ञा नाहीं. (द्रोण हंसतात.) इथें कोण हंसलें बरें ? कुणी असो, आपण मुकाट्यानें या अंधारांतच आपला फराळ भराभर उरकावा! पण ही एक पंचाईत आली आहे ह्मणायची. बाण मारायची विद्या शिकवायला जर राजकुमारांना अंधारांत फराळ करायला आचार्य सांगतात, तर उद्यां अंधारांत केलेला स्वयंपाक असल्याशिवाय अमुक शिकवितां येणार नाहीं, असें जर आचार्य ह्मणूं लागले, तर मोठीच पंचाईत होणार! दुसरें काय, आपल्या पोटावर पाय यायचे! पण असें नाहीं उपयोगी. त्यानीं असें सांगण्यापूर्वीच आपण एकदा अंधेरांत स्वयंपाक करून बघणार! छे:, पण हें जमणार कसें ? या अंधारांत मीं आपल्या हातांनीं वाढलेलीं ताटें घेऊन फराळाला बसलों आहें,

पण, भाजी घेण्याकरिनां ह्मणून ताटांत घालतों तो तिखटांत पडतो—तिखट घेण्याकरितां घालतों तो कोशिंबिरींत पडतो. मग अंधारांत स्वयंपाक करं लागलों ह्मणजे तिखटाऐवजीं मीठ, मिठाऐवजीं तिखट, असा प्रकार व्हायचा, ह्मणजे मग मोठीच गम्मत होईल ह्मणायची! ( द्रोण हंसतात. ) अरे, इथें हसतेंय कोण ? कुणी भूनबीततर नाहीं! ( द्रोण पुन्हा हंसतात. ) पुन्हा कोणसें हंसलें. आतां या पुढें इथे अंधारांत बसून नाहीं उपयोगी.

**द्रोण**—( चाहूल दाखवून ) सूदा, सूदा, बल्लवा! राजकुमारांचे उपहार झाले असतील, तर दीप घेऊन ये पाहूं इकडे.

**बल्लव**—(स्वगत) आचार्यांची स्वारी आली वाटतें. तेव्हां आतां इथें राहून नाही उपयोग. इथून हलकेंच जाऊन स्वयपाकघरांतूनच यांना आलों ह्मणून सांगावें. ( अंधारांतच स्वयंपाक घराकडे जाऊन तेथून ) आलों आलों—

**द्रोण**—शाबास! हा मोठा धूर्त आहे. स्वारी इतका वेळ इथेंच खुशाल उपहार करित बसली होती आणि आतां हा हलकेंच आंत जाऊन ओ देतो! (बल्लव दिवा लावून घेऊन हा 'आलोंच' असें ह्मणत येतो. ) आतां ह्या राजकुमारांची तेव्हांच परीक्षा होईल. ( बल्लव जवळ येतांच त्यास पाहून ) हं. आंत चल.

[ ते उभयतां आंत जातात.

**द्रोण**—दुर्योधना, धर्मा, अरे हा काय प्रकार ! तुह्मी ताटांतील पदार्थांना शिवलांदेखील नाहीं, हें कसें ? हा कर्ण, हा दुःशासन, हे नकुलसहदेव यानांतर एक पदार्थ दुसऱ्या पदार्थांत, दुसरा तिसऱ्यांत, असे घालून अगदीं एकच कालवाकालव करून सोडली आहे. ह्या भीमदादांनींतर हीं दोन्ही ताटें फन्ना केलेलीं दिसताहेत! भीमा, सर्व पदार्थ एकच करून खाल्लेस कीं काय ? खरें सांग!

**भीम**—होय आचार्य, आपल्याजवळ अनृत कसें सांगू !

**द्रोण**—आणि अर्जुनाचें ताटहि बहुतेक रिकामेंच झालेलें आहे. पण जे पदार्थ याचे पानांत उरले आहेत, त्यांत दुसरे पदार्थ मिसळल्याचें दिसत नाहीं, हें कसें ? अर्जुना ! गुप्तप्रदीपाची विद्या तू कुणाकडून शिकला आहेस कीं काय ? शकुनी मामांनींतर आपलें ताटच कुठें पळविलें आहेसें दिसतें! अरे हा काय प्रकार !

**शकुनी**—माझें ताट अंधारांत माझ्यापुढून कुणींसें ओढून घेतलें. बहुधा हें भीमदादांचें काम असावें! कारण त्याच्यासारखा खादाड या साऱ्या मंडळींत दुसरा कुणी नाहीं!

**भीम**—मी जितका खादाड आहें तितकाच दाताहि पण आहें! दुसऱ्याचें उसनें मी कधीं ठेवून घेत नसतों. तुमच्या ताटाचा मोबदला देऊं कीं काय? (धर्मार्जुनास) निसात्त इळळ घिण्ण रिच्च मिस्काट्ट रिंग्ग विन्न तिच्च पिठाच्च हिड्ड खिळळ खिळळ किळळ पिहजित्त पिहह लिन्न! (नसता आळ घेणाऱ्याचें मुसकट रंगवून त्याच्या पाठीचीं हाडें खिळखिळीं केलीं पाहिजेत पहिल्यानें!)

**धर्म**—इच्चार सिन्नाध इथाच्च निच्चास किर्र तिच्च विर्र मिष्ट प्रियाग्ग. (आचार्यां-सन्निध इथंच नकोस करूं त्याच्यावर मुष्टिप्रयोग.)

**अर्जुन**—तिशान्न इच्चा रीच इप्प मिन्न किल्ल सिराख्ख हिआल्ल! (तशानें आचार्यांचा अपमान केल्यासारखें होईल.)

**भीम**—मिल्ल मिदाक्क चिरान्न विष्ष प्रियाग्ग किराण्ण रिस्स क्षिम्म? (मला मोदक चारून विषप्रयोग करणाऱ्यांनां क्षमा?) (धर्मास) दिद्द, तिमाच्च किरात्त पिहाज्ञ तिर्र इगाच्च रिहात्त. पिण्ण यि पिड्ड यि निच्चान्न क्षिम्म निह इप्प यिग्ग! (दादा तुमच्याकरितां पाहिजे तर उगीच रहातों. पण यापुढें या नीचांनां क्षमा नाहीं उपयोगी!)

**दुर्योधन**—आह्मांला कळूं नये ह्मणून हे अन्य-बर्बर-भाषेंत बोलूं लागले!

**शकुनी**—बोलूंदेत रे!

**दुःशासन**—करणार काय हे आमचें वांकडें अशा अन्य भाषेंत बोलून?

**द्रोण**—चला, हात धुआ, शयनमंदिरांत तुमची सर्व व्यवस्था केली आहे तिथें जाऊन विश्रांती घ्या; मी अरुणोदयापूर्वी तुह्मांला उठवायला येईन.

[ सर्व जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ—पंडुप्रासादांतील एक दालन. ]

**बल्लव**—(नौबत झडलेली ऐकून) ही मध्यरात्रीची राजवाड्यांतली नौबत झडते आहे, अझून मला झोंप नाहीं. करूं काय! भीमदादा दोन ताटें चोपतात ह्मणून मीं तीन चोपलीं, पण पचेल तेवढेंच माणसानें खावें कीं नाहीं! जास्त खाल्लें कीं असें अपचन व्हायचें! मला एकसारख्या करपट ढेंकरांवर ढेंकरा येत आहेत. (ढेंकर देऊन वाईट तोंड करतो.) दिवा मालवून झोंप यावी ह्मणून अंथरुणावर मी आडारून अजगरासारखा पडलों आहें, पण हा वेळपर्यंत सगळा अस्वस्थ-

पणा. झोंप म्हणून कशीती नाहीं! मनुष्याला झोंप नसली, कीं त्याला अगदीं वेड्या-सारखें होतें. मी म्हणतों मला झोंप नाहीं अशी भीमदादांनांहि नसेल कदाचित. पण हें प्रत्यक्ष पहावें एकदा आपण. मनुष्याचा असा स्वभावच आहे कीं, फुकटचें मिळालें कीं मार ताव! पण मग हें असें निस्तारावें लागतें!

[ दिवा घेऊन जातो.

**द्रोण**—( बल्लवास पाहून ) कोण तें ?

**बल्लव**—मी तो बल्लव.

**द्रोण**—कां रे बल्लवा ! अशा अपरात्रीं तूं कां असा जागा ?

**बल्लव**—काय करूं गुरुवर्य ! अत्याहारामुळें स्वस्थ झोंपच येईना. ( ढेंकर देऊन ) ह्या पहा, करपट ढेंकरांवर ढेंकरा येताहेत एकसारख्या !

**द्रोण**—एवढ्याचकरितां बाबा मनुष्यानें मिताहारी असावें. गोड लागलें म्हणून हू म्हणून वेळ पाह्यची नाहीं काळ पाह्यचा नाहीं, उजेड पाह्यचा नाहीं अंधार पाह्यचा नाहीं, यथास्थित हात मारून उपयोगी नाहीं! जा, थोडेंसें आलें आणि सैंधव चाव आणि जाऊन नीज जा, म्हणजे तुला बरें वाटेल. [ जातात.

**बल्लव**—हें भीमदादाचें घोरणें इथवर ऐकूं येत आहे. याला कशी इतकी स्वस्थ गाढ झोंप लागली आहे बोवा ! बरोबर आहे; याला मल्लयुद्ध, गदायुद्ध, धनुर्विद्या वगैरे शिकून हवेतितके श्रम होतात. मला ते होत नाहींत. तर यापुढं आपणहि आपल्या शागीर्दपेशांतील लोकांकरितां एक तालिमखाना काढून त्यांत लहानपणच्यासारखी मेहेनत करावी. आणखी या राजकुमारांच्या सारखेच मल्लयुद्ध आणि गदायुद्ध सुरू करावें यांचे पाहून. खुराकाचीतर कांहीं पंचाईतच नाहीं. उद्यांपासून आपण अस्सें करणार! आतां मात्र आचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें थोडें आलें आणि सैंधव घ्यावें आणि जाऊन निजावे, व पहावा थोडा डोळा लागला तर ! पण हें काय बरे ऐकू येत आहे ? हा धनुष्याचा टणत्कार! छेः, तोच नेहेमी नेहेमीं ऐकून मला हा भास तर होत नाहीं!

[ जातो.

**द्रोण**—(ऐकूं येत असल्यासारखें करून) छेः, धनुष्याच्या मौर्वीचेंच सिजम हे. त्याचाच हा टणत्कार. ( दिवा खालीं ठेवून ) हा दीप इथेंच ठेवावा आणि हलकेच जाऊन पहावें, हा कुठून येत आहे तें. अंधारांतील उपहारानें माझा उद्दिष्ट हेतु सुफलित झाल्याचें चिन्ह दिसतें ! निःसंशय अर्जुनाच्या धनुष्याचाच टणत्कार हा! छेः, ह्यासंबंधानें आतां भ्रांतीच नाहीं उरली.

[ दिवा घेऊन एकदम आंत जातात.

.**अर्जुन**—( दिवा पहातांच धनुष्य बाजूस ठेवून उठून ) कोण ! आचार्य ? आचार्यांस माझा प्रणाम असो.

**द्रोण**—अर्जुना ! अरे तुला झोंप कां नाहीं ? तें काय लपविलेंस ? इथें धनुष्याचा टणत्कार होत असल्याचा मला भास झाला ह्मणून मी इथवर आलों. माझ्यापासून लपवून ठेवूं नकोस कांहीं. सत्य प्रकार असेल तो सांग.

**अर्जुन**—( पुनः प्रणाम करून ) गुरुवर्यांच्या चरणांपासून मी कशाला चोरून ठेवूं ? सत्य आहे तेंच सांगतों. मी अंधारांत उपाहार करित असतां माझ्या मनांत असा तर्क आला कीं, अंधारांतहि जर पूर्व निरीक्षणानें नेमक्या पदार्थांवर हात ठेवून उपाहार करितां येतो, तर तसेंच नेमानें अचुक बाणहि कां मारतां येऊं नयेत ?

**द्रोण**—बा अर्जुना ! चल ये, मला एकदा माझ्या हृदयाशीं घट्ट कंवटाळून धरूदे तुला. हा आजचा माझा आनंद गगनांतहि मावणार नाहीं ! कालच्या अंधारांतील उपाहाराची माझी योजना एवढ्याचकरितां होती. खऱ्या धनुर्धरास उचित अशी ही तुझी धारणाशक्ति पाहून मला अत्यानंद होत आहे. सगळ्या जगतांत तुझी कुणीहि बरोबरी करूं शकणार नाहीं अशा तऱ्हेचा प्रवीण धनुर्धर तुला मी करीन, अशी मीं आपल्या मनाशीं आतां पक्की गांठ घातली ह्मणून समज; आणि असें करीन तरच मी द्रोण खरा! तुझी ही तेजस्वी मेधावती पाहून मला अशी खात्री वाटते कीं, माझें उद्दिष्ट कार्य तूं एकटाच उरकून टाकशील. ( पुनः मध्यरात्रीची नौबत होते. ) ऐकलीस, ही मध्यरात्रीची तिसऱ्यांदा नौबत झडते आहे. आतां तूं स्वस्थ नीज. मनुष्याला स्वस्थ झोंप पाहिजे. त्याशिवाय त्याची प्रकृति नीट रहाणार नाहीं. अर्जुना, तुला ह्यापूर्वी दोनदा नौबत झडलेली ऐकूं आली काय ?

**अर्जुन**—नाहीं आचार्य ! माझें लक्ष्यच नव्हतें मुळीं तिकडे. माझें सारें लक्ष्य इकडे लागून राहिलें होतें, त्यामुळें मला कांहींच ऐकूं आलें नाहीं कीं समजलें नाहीं. आपण दिवा घेऊन आलांत तेव्हांच प्रकाशामुळें माझें आपल्याकडे लक्ष्य गेलें.

**द्रोण**—( पुनः आलिंगन देऊन ) बा अर्जुना ! तुझ्यासारखा शिष्य मिळाला ह्मणून आज मला धन्यता वाटते ! हे धनुर्धरा, लक्ष्य साधायला एकाच गोष्टीवर लक्ष्य ठेविलें पाहिजे, ह्मणजे मग कोणचीहि गोष्ट सहज साध्य होते. मनुष्याचें दुर्लक्ष्य झालें, कीं आटपलेंच. मग त्यास कांहींहि साध्य होणें नाहीं. ही एवढी एकच गोष्ट लक्ष्यांत ठेवून तूं अभ्यास कर, ह्मणजे तुला अपजय हा शब्दखील कधीं ऐकूं येणार नाहीं.

**अर्जुन**—आचार्यांची आज्ञा मला शिरसावंद्य आहे.

**द्रोण**—नीज, नीजतर आतां स्वस्थ. मीहि जातों आणि किंचित् विश्रांति घेतों.

**अर्जुन**—( नमस्कार करून ) हा निजलों मी.

**द्रोण**—( जात असतां स्वगत ) प्रत्यक्ष माझ्या पुत्राच्या ठिकाणींदेखील इतकी धारणाशक्ति नाहीं. कुरुकुलश्रेष्ठ भीष्माचार्यांनीं अर्जुनाच्या 'तीव्र बुद्धीचें व विलक्षण धारणाशक्तीचें जें माझेजवळ वर्णन केलें होतें, तें अक्षरशः खरें आहे. हा राजकुमार अर्जुन मला अश्वत्थाम्याहूनहि जास्त प्रिय वाटतो. एकंदरींत मनुष्याच्या अंगचे गुण हे इतरांच्या प्रेमास आपल्याकडे स्वयमेव ओढून घेतात. गुणांच्या ठिकाणीं ही एक अलौकिक आकर्षणशक्तीच आहे. नाहींतर प्रत्यक्ष माझ्या पुत्रापेक्षांहि हा अर्जुन मला जास्त प्रिय कां वाटावा ! त्यांतल्या त्यांत आणखी गुण आणि स्वभावजन्य विनय ह्या दोहींचें दुहेरी जोड–आकर्षण झालें. ह्मणजेतर हें प्रेम अधिकच दुणावतें. हा अर्जुन अगोदरच राजकुमार, सहज-मनोहर, त्यांत गुणी आणि विलक्षण धारणाशक्तीचा. इतकें असून त्याच्या अंगचा विनय व वडिलांच्या ठिकाणीं व माझ्यासारख्या गुरूच्या ठिकाणीं त्याचा तो सहज-आदर, सन्मान ठेवण्याची ती हातोटी व विनयसंपन्न असें भाषण हें पाहून प्रत्येकाला मोह पडलाच पाहिजे; आणि अर्थात् त्याचेसंबंधानें प्रेमहि वाटलेंच पाहिजे. न वाटलें तरच नवल. माझी मनोदेवता मला सांगते कीं, याच्यावर परिश्रम घेतल्यास हा या भरतकुलाचा लौकिक आणि नांव राखील. योग्य शिष्य मिळाल्याचा आनंद कांहीं विलक्षण असतो. तो केवळ स्वसंवेद्य आहे. गुरुशिवाय तो इतरांनां कळणारहि नाहीं ! अश्वत्थाम्यानें दूध ह्मणून पिठवणी घेतल्याचें प्रत्यक्ष आपल्या नेत्रांनीं पाहिल्याबरोबर 'पुत्रमोहा'ची अगदीं बरोबर कल्पना ज्याप्रमाणें माझ्या अनुभवास आली, ती जशी स्वसंवेद्य, तसाच सच्छिष्य मिळाल्याचा आनंदहि स्वसंवेद्यच होय. मनुष्यास अत्यानंद झाला ह्मणजे त्याच्या निद्रेचा भंग होतो. त्या आनंदापासून पुढें जो आणखी नवनव्या आनंदाचा प्रसव होणार, त्या भावी आनंदाच्या मनोरथांची नवीनवी कल्पनासृष्टी उभारून तो त्यांत मज्जन करूं लागतो. अर्थात् मग निद्रा कुठली ! पण निद्रा ही मनुष्याला केवळ विश्रांती-करितांच पाहिजे असते, आणि ही विश्रांति या जागृतावस्थेंतच जर प्राप्त होते, तर मग ह्या निद्रेचीतरी कशाला अपेक्षा करावी ! तरीपण हा मध्यरात्रीचा काल आहे. विश्रांतिमंदिरांत जाऊन परमेश्वराचें नांव घेत कांहीं काल स्वस्थ पडावें हें बरें. सच्चिदानंद, सच्चिदानंद. [ जातात.

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—क्रीडोद्यानासमीपचा भाग. सायुध दुर्योधन, दुःशासन, शकुनी आणि कर्ण बोलत आहेत असा प्रवेश. ]

**दुर्योधन**—आचार्य निःसंशय पक्षपाती आहेत ! कर्णा, तूंच पाहिलेंसना ! गंगोदक कोण लौकर भरून आणतो तें पहाण्याकरितां ह्मणून आह्मां सर्वत्रांस झाऱ्या दिल्या, पण त्यांतदेखील पक्षपात ! आचार्यांनीं मोठ्या तोंडाची झारी अश्वत्थाम्याला दिली, या एकाच गोष्टीवरून पहा ह्मणजे झालें.

**शकुनी**—अरे, तोतर त्यांचा पुत्रच आहे ! त्याच्या संबंधानें त्यांनीं पक्षपात केल्यास नवल नाहीं. पण अर्जुनासंबंधानेंहि त्यांनीं तसाच पक्षपात दाखवावा, ह्मणजे मात्र मोठें आश्चर्य !

**कर्ण**—मी तेंच ह्मणतों ! परवां तूं आचार्यांस एका बाणानें सर्व शिरें छेदतां यावींत हें पार्थास न कळतां आपल्यास शिकवा ह्मटल्याबरोबर त्यांनीं कशी खुबी केली तें पाहिलेंस ना ?

**दुर्योधन**—त्यांत खुबी कसची ! मला त्यांनीं बाणाचा प्रयोग करण्यास शिकविलें, पण मलाच तें साध्य झालें नाहीं, त्याला ते काय करतील ?

**कर्ण**— ते काय करतील ? वाः ! अरे वेड्या, शिष्यांनां शिकवितां येत नाहीं ते गुरु कसले ? मलातर खात्रीनें वाटतें कीं, त्यांचे ठिकाणीं द्विधाभाव आहे.

**दुःशासन**—खात्रीनें द्विधाभाव आहे ! तसा नसता, तर 'तुला व्यर्थ श्रम करूं नकोस, तुला हें साधणार नाहीं' असें आचार्य सांगते काय ?

**शकुनी**—तेंच अर्जुनाचें पहा ! तो झारी भरून सर्वांचे आधीं आला !

**दुःशासन**—आणि झारीचें तोंड लहान असूनहि तो सर्वांचे अगोदर झारी भरून आला, हें आचार्यांनीं त्याला शिकविलें असल्याशिवाय का त्याला आलें ?

**शकुनी**—अर्जुनानें प्रतिज्ञा केल्या दिवसापासून त्याजवर त्यांचें विशेष प्रेम आहे. आणि ह्मणूनच मला वाटतें, ते आह्मां सर्वांनां चोरून गुप्तपणें त्याला जास्त प्रयोग शिकवित असतात.

**कर्ण**—पण आपल्या पुत्राहूनहि आचार्यांचें त्याजवर जास्त प्रेम असेलसें संभवत नाहीं. ( स्वगत ) अर्जुन जात्याच कल्पक आणि चतुर आहे. ( उघड ) बरें, पण अर्जुनानें झारी भरून घेऊन येत असतांना बाणावर झारी ठेवून जी अंतराळीं पाठविली, आणि ती पुन्हा खालीं येते तोंच त्या वटपर्णांचीं देंठें राखून नुसता पानांचा जो बाणानें छेद केला, तो कसा ?

**शकुनी**—अरे काय ह्मणून काय विचारतोस ? आचार्यांनीं त्याला गुप्तपणें शिकविल्याशिवाय का त्याला आलें हें ?

**दुःशासन**—आचार्यांचा हा खात्रीनें पक्षपात आहे, पक्षपात !

**दुर्योधन**—मलामुद्धां आतां हा धडधडीत पक्षपातच वाटतो ! नाहींतर 'तुला हें साधणार नाहीं, व्यर्थ श्रम करू नकोस !' असें ते मला सांगतेना !

**शकुनी**—आचार्यांनीं जरी पक्षपात केला, तरी त्याला एक तोड आहे. आपण अश्वत्थाम्याचें मन प्रसन्न राखलें ह्मणजे तो आपल्याशीं द्विधाबुद्धि ठेवणार नाहीं

**दुर्योधन**—छे:, त्याच्या ठिकाणीं ही द्विधाबुद्धि संभवतच नाहीं ! तो आपल्यास घोड्यावर, हत्तीवर आणि रथांत बसून समरांगणीं कसें फिरवें हें किती प्रेमानें सांगतो.

**कर्ण**—घोड्यावर बसून सिंह, वाघ, रीस, कुंजर, वृक यांच्याशीं आणि तसेंच शरभाशीं आणि वानराशी युद्ध करण्याचे नाना प्रकार शिकवितांना आणि शस्त्रास्त्रांचे प्रयोग सांगतांना तो किती खुल्या दिलानें वागतो ! आमच्यापासून तो यत्किंचितहि चोरून ठेवित नाहीं

**दुःशासन**—मलाहि त्यानें अस्वलाशीं, रानडुकराशीं, गव्याशी कसें युद्ध करावें तें शिकविलेंन, पण त्यांत त्यानें मन मोकळें करून किती खुब्या सांगितल्यात !

**दुर्योधन**—मलाहि मल्लयुद्ध, खड्गयुद्ध आणि गदायुद्ध शिकवितांना माझ्यापासून त्यानें कांहींएक चोरून ठेविलें नाही

**शकुनी**—नसेल; पण मी ह्मणतो, मग भीमाशीं तुझें मल्लयुद्ध होतांना तुझ्यापेक्षां त्याचा जो वरचष्मा होतो, तो कसा ? त्याला तुझ्यापेक्षां कितीतरी जास्त खुबीदार प्रयोग ठाऊक आहेत.

**दुर्योधन**—अरे, हे सगळेच प्रयोग कुठें शिकवून का येत असतात ? कांहीं ज्याचेत्यानेंच बसवावे लागतात. मी जे सगळे प्रयोग करतों, ते कुठें सारेच भीमाला ठाऊक आहेत ?

**कर्ण**—पण तो तोडीस तोड ठेवून देतो कीं नाही ! आणि प्रत्येक वेळीं तुलाच हार खावी लागते.

**शकुनी**—आणि म्हणूनच मी म्हणतों कीं, वरवर अश्वत्थामा जरी खुल्या दिलानें वागत असला, तरी भीमाला गुप्तरीतीनें एकीकडे तो जास्त प्रयोग सांगत असेल. तर आपण असें करूं. अश्वत्थाम्याला आपण आपलासा करूं. त्याला खायलाप्यायला, जेवायला सदासर्वकाळ आमचेबरोबर घेऊन त्याच्यावर-वरवरच कां होईना—जास्त प्रेम दाखवूं; म्हणजे अर्थातच मग तो आपल्यापासून कांहीं चोरून ठेवणार नाहीं. आणखी त्याच्यांत आणि अर्जुनांत हलकेच थोडीशी चुरस उत्पन्न करूं, म्हणजे मग आपल्याला भीति बाळगण्याचें बिलकुल कारण उरणार नाहीं.

**दुर्योधन**—हो, हें मात्र खरें आहे. असे केल्यापासून आपला फायदाच आहे. पण बलराम मामा आले म्हणजे त्यांच्याकडून मी गदायुद्ध पुरें शिकेन.

**दुःशासन**—तर मग त्याला खुलवायचें काम माझ्याकडे लागलें.

( इतक्यात अश्वत्थामा धनुष्य सज्ज करून येतो. )

**शकुनी**—हं चप्प व्हा आतां, हा अश्वत्थामा आला इकडेच !

**अश्वत्थामा**—अरे, तुह्मी अजून इथें कां ? तिकडे वटवृक्षावर एक कृत्रिम गृध्रपक्षी बसविला आहे आणि आपणा सर्वांची धनुर्विद्येतील प्रवीणता पहाण्याकरितां त्याच्या कंठांत मध्यभागीं बांधलेला मणी बाण मारून छेदून पाडायचा आहे आचार्य, धर्म, भीम, अर्जुन वगैरे सगळी मंडळी तिकडे गेली आणि तुह्मी अजून इकडेच ! चला उशीर होईल.

**सर्व**—चला, चला [ सर्व जातात.

**कर्ण**—( स्वगत ) गुरूचा प्रसादतर पाहिजेच. पण विद्यार्जनाला शिष्याच्या ठिकाणीं अगदी बुद्धीहि पाहिजे आणि त्याचा त्याला निदिध्यास लागला पाहिजे. निदिध्यास आणि अभ्यास यांशिवाय गुरूनें शिकविलेलें साध्यतरी कसें होणार ! अर्जुनाचें पाहून त्याच्या बरहुकूम शरसंधान करण्याचा मी प्रयत्न करितों, आणि तो मला अंशतः साध्यहि होतो; पण दुर्योधनादिकांनां तेच प्रयोग मीं स्वतः दहादा करून दाखविले, तरी साध्य होत नाहींत. एकदरींत मला वाटतें, कोणतीहि का विद्या होईना, ती साध्य करणें आहे तर तिच्याकडे सारे तन मन धन लावून तिचा निदिध्यास ठेवून तिच्याच मागें लागलें पाहिजे. म्हणजे आज नाहीं उद्यां ती साध्य झालीच पाहिजे ! [ धनुष्याचा टणत्कार करित जातो.

---

## प्रवेश ९ वा.

[ स्थल—क्रीडोद्यान. एका वटवृक्षाजवळ द्रोणाचार्य शिष्यांसह जमले असून द्रोण व बाण मारणारा एका बाजूस व इतर दुसऱ्या बाजूस असे उभे राहिले आहेत असा प्रवेश. ]

**द्रोण**—अरे अश्वत्थामा आणि दुर्योधनादि राजकुमार अजून कां आले नाहींत?

**अश्वत्थामा**—आलों, आलों तात! त्यांस घेऊनच आलों. ( सर्व येऊन नमस्कार करितात. )

**द्रोण**—कल्याण असो. वेळेवर आलांत. धनुर्विद्येतील तुमची पारंगतता पहाण्याकरितांच आज तुह्मांला इथें बोलाविलें आहे. तो पहा गृध्रपक्षी त्या न्यग्रोध वृक्षावर बांधला आहे. धनुष्य सज्ज करून बाण लावून त्या गृध्रपक्षाला रोंखून तयार असा. मी सांगेन त्यानें पुढें होऊन मीं हूं ह्मणतांच बाण टाकून त्या पक्षाचा कंठछेद करून त्याचें मस्तक व त्याबरोबरच त्याचे कंठांतील तो मणी खालीं पाडावा. हा वेध जो करील त्याला, इथें ठेविलेलें हें रत्नजडित धनुष्य मिळेल.

**सर्व**—ठीक आहे. जशी आचार्यांची आज्ञा. ( सर्व सज्ज होतात. )

**द्रोण**—हं, हे दुर्जया धर्मा! चल पहिल्यानें तूं पुढें ये. धरलास, नीट धरलास नेम त्या पक्ष्यावर? मीं हूं ह्मणतांच बाण टाक. नीट लक्ष्य लाव. वृक्षाचे अग्रभागीं असलेल्या त्या गृध्रावर नीट निशाण धर. हं, धरलेंस?

**धर्म**—हो, धरलें.

**द्रोण**—ठीक आहे. असाच नीट न्याहाळत उभा रहा कांहीं वेळ. (किंचित्काल थांबून) बरें, आतां मला सांग कीं, तुला हा वृक्ष, मी आणि तुझे भ्राते ह्यांपैकीं काय दिसत आहे?

**धर्म**—हा वृक्ष, आपण, भ्राते आणि हा गृध्रपक्षी हीं सर्व मला दिसताहेत.

**द्रोण**—सर्व दिसताहेत?

**धर्म**—हो, सर्व दिसत आहेत.

**द्रोण**—( स्वगत ) तर माझें शिकविणें सर्व निर्फळ झालें! ( उघड ) सर्व दिसत आहेत? नीट पहा!

**धर्म**—होय गुरुवर्य, सर्व दिसत आहेत.

**द्रोण**—सर्व दिसत आहे, तर चल हो पलीकडे! तुला त्या पक्ष्याच्या शिराचा वेध करितां येणार नाहीं. ( त्याला बाजूस करून दुर्योधनास ) चल दुर्योधना! तूं ये इकडे. नीट रोंखून नेम धर, आणि मीं हूं ह्मणतांच बाण सोड.

**दुर्योधन**—ठीक आहे, जशी आज्ञा.

**द्रोण**—रोंखलास बाण ?

**दुर्योधन**—हो, रोंखला.

**द्रोण**—मग सांग बरें, तुला हा वृक्ष, मी आणि हा धर्म दिसताहेत काय ?

**दुर्योधन**—हो, सर्वजण मला अगदीं स्पष्टपणें दिसत आहेत.

**द्रोण**—नीट, नीट पहा. सर्व दिसत आहेत !

**दुर्योधन**—हो हो, सर्व अगदीं स्पष्ट दिसत आहेत.

**द्रोण**—तर चल, तूंहि मागें हो ! धर्माप्रमाणेंच तूंहि अप्रबुद्धच आहेस. तुला हें निशाण मारतां येणार नाहीं. ( शकुनी, दुःशासन, भीम, नकुळ वगैरे येतात; परंतु द्रोण त्यांचा धिक्कार करून त्यांस बाण मागे घेण्यास लावून मागें उभे रहा म्हणून सांगतात.) आतां कुणाची पाळी उरली ? कर्णा ! चल तू ये पुढें. नीट रोंखून बाण धर. किती आकर्ण ओढलास हा ? ठीक आहे, असू दे. मीं हूं म्हणतांच टाक. तुला तो गृध्रपक्षी, तें झाड, मी आणि धर्मदुर्योधनादि मंडळी यांतून कोणकोण दिसत आहेत ?

**कर्ण**—सर्व दिसत आहेत.

**द्रोण**—अरे नीट लक्ष्य लाव. त्या गृध्राचें डोकें उडविलें पाहिजे. बोल, आतां काय दिसत आहे ?

**कर्ण**—वृक्षवंश आणि तो गृध्र ह्या तिन्हींशिवाय मला कांहींएक दिसत नाहीं.

**द्रोण**—अजून नीट लक्ष्य लाव.

**कर्ण**—( स्वगत ) नीट लक्ष्य लाव, नीट लक्ष्य लाव, म्हणून इतरांच्याप्रमाणें मलाहि हे मागेंच ओढणार ! तेव्हां हू म्हणण्याची वाट नाहीं पाहून उपयोग. आपण तीर टाकावाच. (तीर टाकतो; परंतु तो गृध्रपक्षापासून एका हाताचे अंतरानें जातो. )

**द्रोण**—हां हां ! हें काय केलेंस ? मीं हूं म्हणण्याच्या पूर्वींच तीर टाकलास ? मूर्खा, चल मागें हो ! अशानें लक्ष्य साधत नसतें. ( त्याला मागें ओढतात. ) अश्वत्थाम्या ! चल तूं ये पुढें.

**शकुनी**—( कर्ण, दुर्योधनास एकीकडेस ) आतां पहा हां, आपल्या पुत्र-संबंधानें हे कसा पक्षपात दाखवितील तो.

**कर्ण**—निःसंशय दाखविणार ते !

**दुर्योधन**—अरे ! हे शब्द आचार्यांच्या कानांवर गेले, तर काय प्रकार ओढवेल ?

**द्रोण**—हं लावलास बाण ? आकर्ण ओढून धर.

**कर्ण**—(दुर्योधनास) हेंच पहा, मीं धनुष्य आकर्ण ओढलें तेव्हां मला किती आकर्ण ओढलेंस ह्मणून ह्मणाले आणि आतां याला सांगतात आकर्ण ओढ ह्मणून ! तेव्हां हा पक्षपात नव्हे तर दुसरें काय ? माझ्यानें आतां इथें उभें रहावत नाहीं. तिकडे बाजूस जाऊन उभा रहातों आपला मी.

**द्रोण**—बोल, तुला काय काय दिसत आहे ? तो गृध्रपक्षी, तें झाड व आह्मी सारे दिसतों काय ?

**अश्वत्थामा**—मला तुमच्यापैकीं कुणीहि दिसत नाहीं. पण तिथं उभा राहिलेला तो कर्ण, तो वृक्ष आणि तो गृध्र एवढीं मात्र दिसतात.

**द्रोण**—पहा, नीट न्याहाळून लक्ष्य देऊन पहा.

**अश्वत्थामा**—आतां मला वृक्ष आणि गृध्र हे फक्त दोनच दिसतात.

**द्रोण**—मूर्खा, नीट निरीक्षणपूर्वक पहा. आतां पुन्हा सांग. तुला कायकाय दिसतें ?

**अश्वत्थामा**—मला तो पक्षी व वृक्षाचा अग्रभाग हीं दोन दिसताहेत.

**द्रोण**—पुन्हा स्थिर दृष्टी करून पहा.

**अश्वत्थामा**—तरीहि तेंच दिसतें

**द्रोण**—दोन्ही दिसतात ?

**अश्वत्थामा**—हो दोन्ही दिसतात

**द्रोण**—तर फीर, तूंहि मागें फीर ! (त्यास मागें ओढून.) तूंहि ह्यांच्यासारखाच महा मूढ आहेस. अर्जुना ! चल, तूं हो पुढें. यांच्यासारखीच हुशारी तूंहि दाखविलीस ह्मणजे सर्वच आटपलें ! चल, हो पुढें. आपलें धनुष्य सज्ज कर आणि नीट नेम धर. हं धरलेंस निशाण ?

**अर्जुन**—हो, धरलें आचार्य.

**द्रोण**—गृध्रपक्षी, वृक्ष, मी आणि ही इतर मंडळी, यांपैकीं तुला कोण कोण दिसताहेत ?

**अर्जुन**—आचार्य, मला फक्त एक गृध्रपक्षी मात्र दिसत आहे. वृक्ष, आपण अथवा इतर यांपैकीं कुणीहि दिसत नाहीं.

**द्रोण**—कांहीं दिसत नाहीं ! गृध्रपक्षीतरी नीट नखशिखांत न्याहाळतो आहेना ?

अर्जुन—नाहीं. गृध्रपक्षाचें शिर तेवढें मला दिसत आहे. त्याचें बाकीचें शरीर दिसत नाहीं. बाण टाकूं काय ?

द्रोण—बरें त्याच्या कंठांतील मणी ?

अर्जुन—तो मणी आणि त्याची मान बाणाच्या अगदीं एका रेषेंत आलीं आहेत. टाकूं बाण ?

द्रोण—( रोमांचित होऊन आनंदानें ) टाक, टाक! बघतोस काय आतां! ( अर्जुन बाण टाकतो व गृध्रपक्षाचें शिर तोडून खालीं पाडतो. त्याबरोबर अर्जुनास आलिंगन देऊन त्याची पाठ थोपटून ) शाबास, अर्जुना शाबास! आजपासून तुझें नांव मीं धनुर्धर ठेविलें आहे! हें रत्नजडित धनुष्य घे. हें आतां तुझें झालें. (आपल्या गळ्यांतील पदक काढून) हें वीरपदक मी प्रेमपुरःसर तुझ्या कंठभागीं घालतों. हें विजयचिन्ह समजून तूं हें सदासर्वकाळ कंठीं धारण कर.

अर्जुन—(अभिनंदन करून) आचार्यांच्या या कृपेबद्दल मी अत्यंत ऋणी आहें.

द्रोण—धर्मा, तुला आणि तसेंच हा दुर्योधन, हा कर्ण, हा भीम, हा शकुनी या सर्वांनां 'तुह्मांला नेम मारतां यावयाचा नाहीं' असें ह्मणून मीं मागें ओढलें, त्याबद्दल तुह्मां सर्वांला विषाद वाटला असेल; पण तुह्मांला मागें ओढून तुमचा उत्साहभंग करावा असा माझा यत्किंचितहि आशय नव्हता. तुह्मीच पहा, कीं, नेम धरला असतांना तुह्मांला तो गृध्र पक्षी, वृक्ष, मी व इतर मंडळी हीं सर्व दिसत होतीं. हीं सर्व दिसत असतांना तुमचें शरसंधान अचुक व्हावें कसें? त्या अश्वत्थाम्याला इतकें पढविलें असून त्यालाहि वृक्षाग्र व पक्षी हीं दोन्हीहि दिसत होतीं. तेव्हां त्यालाहि फक्त लक्ष्य वस्तूवरच पूर्णपणें दृष्टि स्थिर झाल्याशिवाय अचुक तीर टाकणें शक्यच नव्हतें; आणि एवढ्याचकरितां तुमच्यापैकीं प्रत्येकास मला अत्यंत खिन्न होऊन मागें ओढावें लागलें. तेव्हां यापुढें कुणींहि खिन्न न होतां व चित्तांत विषाद न मानतां पूर्ण लक्ष्य देऊन शिकत जा, एवढेंच माझें तुह्मां सर्वांस सांगणें आहे.

धर्म—यांत खिन्न होण्याचें व विषाद मानण्याचें कारण काय आहे? उलटें आज आह्मी एक नवीनच शिकलों असें समजलें पाहिजे. यापुढें असाच सराव करूं.

द्रोण—बरें तर, मी आतां आश्रमाकडे जातों. तुह्मी आज त्याचाच सराव करा. पाहूं अभ्यास कसें आणि कितपत साध्य होतें तें. [ जातात.

**भीम**—(अर्जुनाची पाठ थोपटून) शिबास्स इर्जो न शिबास्स! तिच तिंइ पिह्ह फिरशा किळ ठिक्कार पिडाळ इहास? ( दुर्योधन व कर्णाकडे पाहून हंसत ) चिरांच निकांच विजाच इत्ता रिळ! (शाबास अर्जुना शाबास! त्यांचीं तोंडं, पहा कशीं काळीं ठिक्कर पडलीं आहेत. चोरांच्या नाकांची वेजच उतरली!)

**शकुनी**—तो पहा लंकेश्वर आमच्याकडे पाहून हंसतो आहे आणि अर्जुनाशीं आह्माला अनुलक्षूनच कांहींतरी बोलतो आहे आणि कुजबुजतो आहे.

**दुर्योधन**—कुजबुजूंदे कुजबुजूंदे, याचा समाचार मी घेईन! चला जाऊं आपण इथून.

[ सर्व जातात.

**द्रोण**—( पडद्याबाहेर येऊन स्वगत ) नैसर्गिक बुद्धिमत्तेपुढें आस्थापूर्वक केलेला अभ्यासहि फिक्का पडतो! मग नैसर्गिक बुद्धिमत्ता, आस्थापूर्वक अभ्यास आणि उत्साह हीं तिन्हीं एकवटल्यावर विलक्षण प्रभाव दृष्टीस पडावा, यांत नवल तें काय? अर्जुनाचें हें अलौकिक शरसंधान पाहून माझा मीच थक्क होऊन गेलों व आनंदातिशयानें माझी सर्व तनु रोमांचित झाली. आतां द्रुपदास जिंकून त्याचा मद हरण करण्याची माझी मनीषा पूर्ण करण्यास किती उशीर! हे दुर्योधन कर्णादिक, भीमार्जुनांचा यापुढें जास्त मत्सर करणार, हें मी जाणून आहें. तो दुर्योधन अर्जुनास न कळतां आपल्यास एका बाणानें समस्त शिरें छेदतां येण्याचे प्रयोग शिकवा ह्मणून माझ्या पाठीमागें लागला होता. यांत त्याचे कांहीं पापहेतुतर नसतील! कुणीं सांगावें. दुष्टबुद्धि व हेवेखोर मनुष्यें परोत्कर्षासहिष्णु असतात. त्यांस ती दुष्टबुद्धि व तो हेवा हीं निबिड पापपंकाकडे ढकलून देत असतात. त्यांत त्यांचे एकदा पाय रुतले ह्मणजे त्यांतून बाहेर निघणें मग त्यांनां अत्यंत दुर्घट होतें. तें पापकुंडच मग त्यांनां अमृतकुंड वाटूं लागतें व असें झालें ह्मणजे मग त्यांचा उद्धार ह्मणजे पापकुंडांतून नरकलोकीं प्रयाण करण्यांत! तिथें गेल्यावर मात्र मग त्यांनां पश्चात्ताप होतो. पण इतकी कालावधि लोटल्यावर हा पश्चात्ताप काय उपयोगी! असो. आपणतरी विद्यादान देतांना कुपात्रीं दान करूं नये, हें आपलें कर्तव्य आहे. तेवढें आपण केलें ह्मणजे आपण आपलें योग्य तें कर्तव्य बजावलें असें होईल. इकडे आल्यास मला बराच काल झाला, तर आतां आश्रमाकडे जावें.

[ जातात.

---

## प्रवेश ६ वा.

[ स्थळ—पंडुप्रासाद. कृपी आणि द्रोण प्रवेश करितात. ]

**कृपी**—द्रुपदराजाचा आणि कुरुकुलाचा आप्तसंबंध आहे, हें ठाऊक आहे का इकडे?

**द्रोण**—हो, मग?

**कृपी**—मग काय? श्रेष्ठ शांतनव भीष्माचार्यांकडून द्रुपदाला म्हणे एक पत्रिका गेली होती, कीं, त्याचा मुलगा सत्यजित याला धनुर्विद्या शिकण्याला इकडे पाठवून द्या म्हणून—

**द्रोण**—मग, त्याचें काय?

**कृपी**—इकडचें नांव घेऊन लिहलं होतं म्हणे, कीं कुरुवंशांतल्या राजकुमारांनां इकडून शिकवायचं होतंय, तर अनायासं त्यांच्याबरोबर तोहि शिकेल. पण त्या गर्विष्ठानं काय पण मस्तवालपणाचं उत्तर पाठविलंन! सांगवत नाहीं बाई माझ्याच्यानं. तें अगदीं अपमानाचं आहे—

**द्रोण**—कुणाच्या! माझ्या?

**कृपी**—हो, इकडच्या आणि त्यांच्याहि!

**द्रोण**—काय, काय उत्तर पाठविलंन्—बोल बोल! अर्धवट सांगून अशी स्तब्ध राहूं नकोस. तुला कुणीं सांगितलें? कृपाचार्यांनीं कीं काय?

**कृपी**—हो. माझ्या सत्यजिताला शिकविण्याला कुणीहि समर्थ नाहीं. तुम्हीं राजकुमारांनां शिकविण्यास ठेविलेल्या आचार्यांनांदिखील तो अस्त्रविद्येंतील आणि धनुर्विद्येंतील त्यांनां ठाऊक नाहींत असे प्रयोग आज शिकवूं शकेल. कुरुनंदनांची विद्या पूर्ण व्हावी असं आपल्यास वाटत असेल, तर आपण ठेविलेल्या आचार्यांसच इकडे कांहीं दिवस अभ्ययन करण्याकरितां पाठवून द्यावं, म्हणजे त्यांनां पूर्ण शिक्षण देऊन थोड्याच कालांत परत पाठवून देऊं—

**द्रोण**—(त्वेषानें) हा कुरुपतीचा अपमान नव्हे! हा निःसंशय माझा अपमान आहे. आणि ही अपमानाची गोष्ट कृपाचार्यांनीं आणि भीष्माचार्यांनीं मला कां नाहीं कळविली? माझ्यापासून कां चोरून ठेविली?

**कृपी**—त्यांनीं मुदामच नसेल कळविलं इकडे.

**द्रोण**—द्रुपदानें हें असलें उत्तर केवळ माझाच उपमर्द आणि अपमान करण्याकरितांच पाठविलें असलें पाहिजे. या निरोपानें माझ्या अपमानाबरोबर त्यानें कुरुपतीचाहि अपमान केला आहे. आतां मात्र माझ्या अवमानाची शिखा एकदम

प्रदीप्त होऊन हिनें माझ्या अंतःकरणांत पूर्णपणें पेट घेतला आहे. मी आतांच्या आतां श्रेष्ठ भीष्माचार्यांकडे जातों आणि उद्दीक सूर्योदयाचे पूर्वी कुरुसैन्य घेऊन द्रुपदावर तडक चाल करून जातों. द्रुपदाला त्याच्याच रक्ताचें स्नान घालीन आणि त्याच्या रक्तप्रवाहांत जेव्हां मी अवगाहन करीन तेव्हांच माझ्या अंतःकरणांत पेटलेला हा कोपाग्नि शमेल, एरवीं हा कधींहि शमणार नाहीं!

**कृपी**—पण मी ह्मणतें, अशी घाई—

**द्रोण**—काय ह्मणतेस? आतां मी हें तें कांहींएक ऐकत नाहीं! हा मी शस्त्रागारांत जातों, आणि तिथें सज्ज होऊन एकदम परस्पर श्रेष्ठ भीष्माचार्यांकडे जातों.

[ जातात.

**कृपी**—पण माझं ऐकूनतरी घ्यायचं! छे बाई! माझं ऐकूनहि न घेतां शस्त्रागाराकडे तडक जायचं झालं, तर आतां मीच तिकडे जातें अन् पहातें सांगून. मला वाटतं, स्वतः जाण्यापेक्षां इकडच्या शिष्याकडून जर त्याला आणि त्याच्या मुलाला जिवंत धरून आणविला, तर त्याचा जास्त अपमान होऊन त्याच्यावर सूड उगविल्यासारखा नाहीं का होणार? जातें आणि पहातें सांगून. मलातरी हेंच बरं दिसतं.

[ जातें.

[ पडदा पडतो. ]

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

[ स्थळ—पंडुप्रासाद. कृपी व अश्वत्थामा प्रवेश करितात. ]

**कृपी**—अजून अश्वत्थामा आला नाहीं ! याला काय करावं ? सदान्कदा आपल्या याचा पाय वाड्यांत. तिकडूनहि घरीं असायचं नाहीं. नेहमीं राजकुमारांनां घेऊन आपलं क्रीडोद्यानांत जायचं. इथं मला एकटीला करमत नाहीं. इथं दासदासी पुष्कळ आहेत, पण त्यांच्याशीं मी कसलं हितगुज करूं ? (इतक्यांत अलंकारांनीं विभूषित होऊन अश्वत्थामा येतो त्यास दुरून पाहून) कोण दुर्योधन ! हे., हातर माझाच लाडका अश्वत्थ ! कारे अश्वत्था ! आज अगदीं नट्टनथट्टनस आला आहेस ? दृष्ट काढली पाहिजे बाई आज माझ्या बाबाची ! मला वाटलं कीं दुर्योधन नाहींतर दुःशासन आला आहे !

**अश्वत्थामा**—इतका ओळखूं येईनासा दिसतों मी ?

**कृपी**—हो हो, इतका ओळखूं येईनासा दिसलास. बाळा ! हा पोषाख आणि हे अलंकार कुणीं दिले तुला ?

**अश्वत्थामा**—दुर्योधनानें.

**कृपी**—ते कां ?

**अश्वत्थामा**—मीं त्याला कांहीं नवनव्या अस्त्रांचे प्रयोग शिकविले ह्मणून.

**कृपी**—पण तू कां घेतलेस हे ? उद्यां राजवाड्यांतून कांहीं बोभाटा आला ह्मणजे ?

**अश्वत्थामा**—मीं हे घेतच नव्हतों; पण त्यानें मला आपला बंधू ह्मणून बळेंच हे माझ्या अंगावर घातले, तेव्हां माझा नाइलाज झाला.

**कृपी**—तरीच, तूं आतांशा थोरल्या वाड्याकडे फार अमनोस !

**अश्वत्थामा**—दुर्योधनासारखा दिलदार आणि उदार सगळ्या राजपुत्रांत दुसरा नाहीं.

**कृपी**—पण कायरे, शिकण्यासवरण्यांत राजकुमारांत कोण हुशार आहे ?

**अश्वत्थामा**—अग, अमुकच ह्मणून कसें सांगतां येईल ! जो तो आपआपल्या परीनें हुशारच आहे.

**कृपी**—पण तिकडूनतर नेहमीं अर्जुनाची प्रशंसा होत असतेना ? आणि मग तूं असें कसं ह्मणतोस ?

**अश्वत्थामा**—अग, अर्जुनाच्या संबंधानें तातांचा थोडा पक्षपात आहे, असें दुर्योधनकर्णादि मंडळी नेहमीं ह्मणत असतात; आणि त्यांचें हें ह्मणणें अगदींच खोटें नाहीं, असें मलाहि पण वाटूं लागलें आहे आतां.

**कृपी**—ह्मणजे! परवांच तुलादिखील नाहींका सांगायचं झालं, कीं, अर्जुन फार बुद्धिवान् आहे, त्याच्याशीं ऐक्य ठेवून अत्यंत प्रेमानं आणि स्नेहानं वागत जा ह्मणून.

**अश्वत्थामा**—हो नाहीं कुणीं ह्मटलें! अग तो बुद्धिवान् आहे खरा, पण जरासा गर्विष्ठ आहे.

**कृपी**—अरे, पण काल तूंच ह्मणत होतासना, कीं, अर्जुनाइतकी तिकडच्यांवर कुणाचीहि भक्ति नाहीं ह्मणून ! आणि काल गंगेवर स्नानाला जाणं झालं आणि तिथं सुसरीनं पायाची पोटरी धरली तेव्हां त्यानंच पाण्यांत बाण टाकून सुसरीला वेध करून तिच्यापासून तिकडची मुक्तता केली आणि प्राण वांचविले, आणि त्यामुळंच त्याच्यावर प्रसन्न होऊन त्याला ब्रह्मशिर अस्त्र द्यायचं झालं; आणि मग आजच कां असं ह्मणतोस?

**अश्वत्थामा**—अग, असें नव्हे; अर्जुन धनुर्विद्येत सर्वांपेक्षां प्रवीण आहे. पण इतर राजकुमार इतर विद्येंत प्रवीण आहेत. बरें पण मला तूं कांहींतरी थोडें उपाहाराला दे. राजकुमारांचें शिक्षण संपल्यामुळें त्यांची आतां भीष्माचार्य, धृतराष्ट्र, यांच्यापुढें परीक्षा व्हायची आहे. त्याकरितां जी नवीन रंगभूमी निर्माण केली आहे, ती काय पण शृंगारली आहे ! तात आज तिकडेच गुंतले आहेत. आज दिवस आणि नक्षत्र हीं दोन्हींहि चांगलीं आहेत. करितां आज भूमिदैवतांची शांती करून बलिदानें द्यावयाचीं आहेत, ह्मणून सर्व राजकुमार तिकडे इतक्यांत येतील; यासाठीं मलाहि तिकडे लौकर गेलें पाहिजे. तर चल लौकर, उपाहाराला दे पाहूं.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ स्थल—रंगभूमीजवळचें उपाहारगृह. बल्लव प्रवेश करितो. ]

**बल्लव**—मनुष्याला भाकरीकरितां चाकरी करावी लागते आणि भिक्षेची झोळी चुकविण्याकरितां पोळी भाजण्यासारखें नादान कामहि पतकरावें लागतें. ही पोटाची होळी नसती ह्मणजे ती झोळीहि नको होती आणि या पोळीचीहि गरज नव्हती !

पण जोंपर्यंत हें पोट पाठीच्या मागच्या बाजूला चिकटून राहिलें आहे, तोंपर्यंत त्याची खोट पडून कसें होणार? या रंगभूमींत इतका रंग चालला आहे, भीष्माचार्य, कृपाचार्य, राजे धृतराष्ट्र, विदुर, कुंती, गांधारी आदिकरून राण्या, पौरस्त्रिया आणि हस्तिनापुरचे सारे नागरिकजन, राजपुत्रांची विद्या कशी काय झाली आहे तें पहाण्याकरितां जमले आहेत. पण मी घटकाभर स्वस्थपणानें जाऊन पाहीन म्हटलें, तर मला कुठें फुरसत आहे! हे दुर्योधन, शकुनीमामा वगैरे कांहीं घोटाळा करवितील म्हणून अर्जुनानें माझी ह्या उपाहारगृहावर नेमणूक केली आहे. इथून मधूनमधून मला काय पहावयास मिळेल तेवढेंच. पण मी म्हणतों, मला जर डोळेच नसते तर अगदीं पुढें बसूनतरी मीं काय केलें असतें! धृतराष्ट्रराजाला डोळे नाहींत. तो बिचारा अगदीं पुढें बसला आहे तरी बघणार काय? जवळ बसलेले विदुर जें काय पाहून सांगतील तेंच तो ऐकणार! गांधारीनें जरी डोळे बांधून घेतले आहेत, तरी तिची दृष्टी शाबूत आहे. तिच्या मनांत पहावयाचें आलें तर चोरूनतरी एखादवेळ तिला पहातां येईल. ( इतक्यांत भीमसेन गदा घेऊन येतो. ) हे आलेच कोणसे—हेतर भीमदादा!

**भीमसेन**—बल्लवा, बल्लवा! कायरे, तिथें उभा राहून काय करतोस? चल झटपट मला थोडें दूध दे पाहूं! (बल्लव दूध देतो.) अरे, यांत शर्करा आणि मसाला घातला आहेस कीं नाहीं?

**बल्लव**—आपल्यास शर्करा जास्त लागते म्हणून हें निराळें आटवून मसाला बिसाला घालून मुद्दाम तयार करून ठेवलें आहे. पण अगोदर थोडें फराळाचें घ्यावें. (स्वगत) याला थोडें म्हटलें तरी दहाजणांचें एकट्यालाच पाहिजे!

**भीमसेन**—अरे, आतांच फराळ उपयोगाचा नाहीं. आतां नुसतें दूधच बस्स. फराळाला वेळ लागेल. ( दूध पिऊन झटपट निघून जातो. ) माझे आणि दुर्योधनाचे दोन हात झाले, म्हणजे मग फराळ; मध्यें नाहीं.

**बल्लव**—जरा कुठें पहावयास उभें राहिलें, कीं कुणीतरी येतेंच! ( पुनः खिडकींत तोंड घालून उभा रहातो इतक्यांत दुर्योधन येतो. )

**दुर्योधन**—कोण आहे, बल्लव! मला दूध दे पाहूं झटपट. नुसतें दूध हां.

**बल्लव**—हं, हें दूध.

**दुर्योधन**—(प्यावयास लागतो, त्यांत साखर नाहींसें पाहून पेला फेंकून देतो.) मूर्खा, यांत साखर कुठें आहे?

**बल्लव**—नुसतें दूध मागितलेंत ह्मणून दूध दिलें.

**दुर्योधन**—अस्सें! नुसतें दूध मागितलें ह्मणून दूध दिलें, मग पेला कशाला दिलास? नुसतेंच दूध द्यायचें होतेंस. मूर्ख नाहींतर!

**बल्लव**—( स्वगत ) याला नुसतें दूध कसें द्यायचें? नुसतें दूध जमिनीवर पडलें आहे. ( उघड ) तरमग साखर टाकून देऊं कां?

**दुर्योधन**—छेः, तिखट टाकून दे! ( एक पात्र घेऊन ) हें यांत काय आहे?

**बल्लव**—तें भीमदादांकरितां अधिक साखर घालून मुद्दाम तापवून ठेविलें आहे.

**दुर्योधन**—भीमदादाकरितां का मुद्दाम तयार केलें आहेस? ( पितो. ) मलाहि जास्त गोड लागतें! ( पिऊन वेगानें निघून जातो. )

**बल्लव**—जो येतो तो झटपट आणि चटपट! पण मला खटपट पडते तिच्याकडे कोण बघतो! ( दूध तापत ठेवून पुनः खिडकींतून पाहूं लागतो, इतक्यांत अर्जुन येतो. )

**अर्जुन**—बल्लवा, बल्लवा! भीम इथें येऊन दूध घेऊन गेला काय?

**बल्लव**—दूध घेऊन नाहीं गेले, पिऊन गेले!

**अर्जुन**—अरे, भलत्याच वेळीं काय थट्टा! केव्हां गेला?

**बल्लव**—दुर्योधनरायाच्या पुढेंच.

**अर्जुन**—तर चल, मलाहि दे थोडें नुसतेंच दूध झटपट.

**बल्लव**—( स्वगत ) झटपट, झटपट, जो येतो तो झटपट!

**अर्जुन**—काय, पुटपुटतोस काय?

**बल्लव**—कांहीं नाहीं, जे येतात त्यांनां झटपट पाहिजे. अंमळ लटपट नाहीं सोसत; बरें, पण थोडें फराळाचें देऊं का?

**अर्जुन**—नुसतें दूध.

**बल्लव**—नुसतें दूध? तें मला साफ देतां येत नाहीं. पेला आणि दूध दोन्ही देतों पाहिजेतर.

**अर्जुन**—अरे, भलत्याच वेळेला विनोद कसला? चल, तुझ्याच ह्मणण्याप्रमाणें होऊंदे; पेला आणि दूध दोन्ही आण.

**बल्लव**—तसें नव्हे, नुसतें दूध दिले ह्मणून दुर्योधनराय रागावले आणि त्यांनीं पेला फेकून दिला; ह्मणून विचारतों, कीं, नुसतें-साधें दूध पाहिजे कीं साखर आणि मसाला घातलेलें पाहिजे?

**अर्जुन**—चल, कसलेंहि दे, पण झटपट दे. (बल्लव दूध देतो व अर्जुन पिऊन त्वरेनें निघून जातो.)

**बल्लव**—जो येतो तो झटपट झटपट ह्मणत वटवट करितच येतो आणि दूध घटघट पिऊन चालता होतो. मला मात्र खटपट पडून माझी लटपट उडते, अन् ही कर्मकटकट चुकत नाहीं! मीच दणकट आहें ह्मणून बरें, नाहींतर यांची ही झटपट मला लटपटायलाच लावती. कोण त्रास! आतां असें नाहीं उपयोग! तो पडदा आड सारून आपण खिडकींत त्याच्या आड उभें रहावें, आणि कुणीं आलें तरी हूं कीं चूंदेखील करूं नये. शागीर्दपेशांची ही अशी स्थिति असते! कोण ताबेदारी ही! (रंगभूमीकडे पाहून) हं, दुर्योधनाची आणि भीमदादाची ही गदायुद्धाची झटपट सुरु व्हावयाची होती, आणि ह्मणूनच दुधाची इतकी झटपट! अगोदर दुधाशीं झटपट आणि मग हाताची झटपट! अगोदर तनाना अन् मग अनाना, असातर सगळ्या जगांतलाच न्याय आहे! अहाहा! काय शिताफी! शाबास, शाबास! दोघेहि कसलेले आहेत; कुणी कुणास हार जात नाहीं; यांचें हें युद्ध पाहून मलाहि पण हुरूप येतो. मी जर गेलों तिथें गदेऐवजीं हा पळा घेऊन, तर काय गम्मत उडेल! पण माझा हुरूप हें दूध ढवळून अटींव करी तोंपर्यंत ढवळण्यांतच विरून जातो! मघाशीं धर्माचें आणि अश्वत्थाम्याचें तें शस्त्रयुद्ध झालें तें पाहून मला कोण अवसान आलें होतें? त्या वेळेस मला वाटलें कीं, आपणहि मारे झार आणि उलथनी घेऊन सगळ्या लोकांच्यापुढें घुसून आपलें हस्तलाघव दाखवावें! पण इतक्यांत जेव्हां नकुल, सहदेव फराळ करायला आले, तेव्हां अर्थातच तें अवसान सारें जिथल्या तिथें थंडगार झालें! हें कोण आलें आणखी पुन्हा झटपटी करायला? आलें असेल कुणीतरी! (इतक्यांत दोन आचारी प्रवेश करितात.)

**लड्डुक**—बल्लवा, ए बल्लवा! अरे गेला कुठें हा? स्वारी बहुतेक भीमदुर्योधनाचें गदायुद्ध पहायला गेली असेल!

**पुंडलीक**—नाहींतर फराळावर ताव मारून इथेंच कुठेंतरी डारडुर करित लोळत पडली असेल! हें बघ लड्डुका, आतां असें नाहीं उपयोगी; हाका मारण्यांत अर्थ नाहीं. तो निजला असेल तर निजूंदे बिचाऱ्याला स्वस्थ. आपण थोडा फराळ करूं आणि पुनः जाऊं पहायाला.

**लड्डुक**—पुंडलीका, तसें नको बाबा! तो मोठा कर्दनकाळ आहे. त्याच्या परवानगीशिवाय आपण जर इथें फराळ केल्याचें त्याला कळलें, तर तो उभ्याचे उभे

चिरून खाईल आपल्याला. त्यानें आपल्याला पहांयला जाण्यास परवानगी दिली, हेंच त्याचे उपकार समज.

**पुंडलीक**—परवानगी दिली! पण कां दिली, हें ठाऊक आहे का तुला? अरे आह्मी गेलों ह्मणजे आपल्यास हवेंतसें यथास्थित चापायला मिळावें, यापेक्षां दुसरा काय त्याचा उद्देश आपल्याला परवानगी देण्यांत? त्याच्यासारखा खादाड, झोंपाळू, तोंडाळू, (बल्लव उभ्याउभ्या घोरतो तें ऐकून) लड्डुका, हें ऐकलेंस घोरणें? बल्लवाचेंच घोरणें हें! कुठून ऐकूं येत आहे हें? (पडदा बाजूस करतो.) अरे हातर इथें उभ्यानेंच झोंप घेत आहे. मीं ह्मटलें नाहीं तुला, कीं, स्वारी कुठेंतरी डारड्डर करीत पडली असेल ह्मणून?

**लड्डुक**—अरे मोठ्यानेंतरी बोलूं नकोस, तो जागा होईल एखादा. थांब, उभ्याउभ्या निजला तर तो पडेल एखादा. आपण त्याला आडवा करूं. (बल्लव डोळे मिटून मोठ्यानें हंसतो.)

**पुंडलीक**—अरे हा झोंपेंतच हंसतोय वाटतें! हा उभ्यानें निजण्याचा आणि झोंपेंत असतांना एवढ्या मोठ्यानें हंसण्याचा विलक्षण प्रकार नव्हता आपण कधीं पाहिला! ही एक विचित्र मूर्तीच आहे ह्मणायची!

**बल्लव**—(पुंडलीकाचे श्रीमुखांत देतो.) अरे, श्रीमुखांत कुणीं दिली कुणाच्या? ही ऐकल्याबरोबर मी जागा झालों! मी जसा झोंपाळू आणि तोंडाळू आहें, तसा हाताळूहि पण आहें. कारण अधिक प्रसंग करणाराच्या श्रीमुखांत भडकवायला माझा हात नेहेमीं खुरखुरत असतो!

**लड्डुक**—तर मग तूं जागा होतास कीं काय?

**पुंडलीक**—(गाल चोळीत) हा खास जागा होता.

**बल्लव**—जागा होतों ह्मणजे! तर तुह्मांला तिकडे पाह्यला पाठवून देऊन मी इथें झोंप घेत पडलों असेन, असें वाटलें तुह्मांला? इथें माझी काय झटपट चालली होती, तुह्मांला काय ठाऊक! तुह्मी गेल्यापासून हा गेला तो आला, तो गेला हा आला, असा प्रकार चालला होता एकसारखा. आतां मीहि पण जाणार आहें थोडा वेळ पाह्याला; या आधाशी पुंडलीकाला बसूंदे इथें एकट्यालाच. आणि ते दुर्योधन, भीम हौद्यांतून वर चढले, कीं, आपण हे लांकडाचे पळे घेऊन कुणाला न समजतां एकदम जाऊन आंत उतरूं, आणि आपल्या युद्धाचा थोडा मासला दाखवूं लोकांनां. चल, हा घे पळा. पुंडलिका! अरे तूं अजून काय गाल चोळित उभा? मीं आपलें तें सहज

विनोदानें मारिलें. (त्याच्या कानाशीं पुटपुटून) एवढें लक्ष्यांत ठेव, ते भीमदादा आले, कीं, तें फराळाचें आणि तें दूध त्यांच्यापुढें ठेव. आतां तूं आणि ती झटपट, समजलं ?

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थल—रंगभूमी. भीम व दुर्योधन यांचें
गदायुद्ध चाललें आहे असा प्रवेश. ]

**द्रोण**—अश्वत्थाम्या ! जा जा, आंवर आंवर त्या दोघांनांहि. ते दोघेहि महावीर्यवान् आणि प्रतापी आहेत. त्यांपैकीं कुणी कुणाला हार जाईलसें दिसत नाहीं; त्यांनां आतां आंवरलेंच पाहिजे. नाहींतर हें यांचें युद्ध रङ्ग-प्रकोपाला कारण होऊन प्रेक्षकांच्याहि संतापाला कारण व्हावयाचें !

**अश्वत्थामा**—( पुढें होऊन ) थांबा, थांबा ! पुरे करा, पुरे करा ! छे, हा भीमाचा आघात दुर्योधनाच्या पोटरीवर बसला. (अश्वत्थामा एका हातानें दुर्योधनास धरून दुसऱ्या हातानें भीमाचें निवारण करून त्यांस थांबवूं पहातो. )

**दुर्योधन**—ए अश्वत्थाम्या ! या वेळीं तूं मध्यें येऊं नकोस. मला या प्रहाराचें उट्टें काढलें पाहिजे.

**अश्वत्थामा**—यापुढें युद्ध चालू ठेवण्याची आचार्यांची आज्ञा नाहीं. (त्यांस धरून आचार्यांसमीप नेतो. )

**द्रोण**—( त्यांच्या पाठी थोपटून ) शाबास, शाबास ! तुह्मीं दोघांनींहि आज मोठं नैपुण्य दाखवून प्रेक्षकांनां आनंदित केलेंत. त्या आनंदाचा—भलताच एखादा प्रकार ओढवून—भंग होऊं नये, ह्मणून तुह्मांला आंवरलें, याबद्दल कोणींहि विषाद मानू नये. तुमची इच्छा असल्यास तुह्मां दोघांनां आणखी एकदा फिरून युद्ध करण्याची संधी मिळेल. आतां जरा विश्रांति घ्या. ( अश्वत्थाम्यास ) आतां धनुर्धर अर्जुनाला पुढें येऊं द्या !

( इतक्यांत बलव आणि लङ्घुक एकदम पळे घेऊन हौद्यांत
उतरतात व प्रेक्षकांस प्रणाम करून पवित्रे करितात. )

**द्रोण**—( साश्चर्य ) अरे हे कोण !

( दोघे पळ्यानें युद्ध करितात. )

**द्रोण**—अश्वत्थाम्या, त्यांनां इकडे जवळ बोलाव पाहूं. कोण हे ?

**अश्वत्थामा**—(हंसून) तात! हा आपला बल्लव आणि हा वाड्यांतला लड्डुक! (एकच हंशा पिकतो.)

**द्रोण**—बल्लवा! तूं भलतेंच काय हें साहस केलेंस?

**बल्लव**—आचार्य, क्षमा असावी आह्मांला. हें भीमदादांचें आणि दुर्योधन-रायांचें गदायुद्ध पाहून मला विलक्षण अवसान आलें आणि मग माझ्यानें राहवेना ह्मणून या लड्डुकाला घेऊन येऊन मीं हें साहस केलें. याची क्षमा असावी.

**द्रोण**—अरे अशा वृद्धावस्थेंत तुला असें हें अवसान आलें हा मोठाच चमत्कार! काय तुझ्या मनांतून या लड्डुकाशीं मल्लयुद्ध करायचें आहे? करित असलास तर तुला परवानगी देतों. पण तूं वृद्ध आणि हा तरुण! तुला हा केव्हांच लोळवील!

**बल्लव**—मी वृद्ध झालों ह्मणून काय झालें? या पोराला का मी हार जाईन आचार्य, आपणहि वृद्ध आहांत, पण आपल्यापुढें या राजकुमारांचें कांहीं चालेल का?

**द्रोण**—अरे, मल्लयुद्धांत केवळ शक्तीचें काम असतें.

**बल्लव**—होय, पण आचार्य, मी जितका वेळ दूध आटवित उभा राहीन तितका वेळ याच्यानें कढईजवळ नुसतें उभेंहि राहवणार नाहीं!

**द्रोण**—बरेंतर, हा अर्जुन आपलें हस्तलाघव दाखवून गेला ह्मणजे मग तुह्मी दोघे या. मग पाहूं तुमचें युद्ध.

**बल्लव**—ठीक आहे. जशी आचार्यांची आज्ञा. (बल्लव व लड्डुक बाजूस जातात.) लड्डुका, चल, आपण आतां दूध पिऊन येऊं.

[ जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ स्थल—उपाहारगृह. ]

**बल्लव**—लड्डुका, आपल्याला दोघांनांहि या युद्धानें फार श्रम झाले आहेत नाहीं बोआ? तर चल आपण उपाहारगृहांत जाऊन थोडा फराळहि करूं आणि मग अर्जुनाचें हस्तलाघव पहायला जाऊं.

**लड्डुक**—चल तर. (उपाहारगृहाकडे जातात.)

**बल्लव**—हे फेटे आपल्याला आतां काढून टेविले पाहिजेत. आणि मल्लयुद्ध करितांना नुसत्या चड्ड्या नेसून गेलें पाहिजे, समजलें?

**लड्डुक**—ठीक आहे.

बल्लव—अरे, आंत जाऊन पुंडलीकाची आपण जरा आतां गम्मत करूं. (पुंडलीक फराळ चापित बसला आहे. आंत जाऊन निराळ्या स्वरानें ) बल्लवा, ए बल्लवा, चल, थोडं दूध दे पाहूं मला झटपट! अगदीं झटपट, झटपट, झटपट! अरे पण इथें आहे कोण? कुणीच दिसत नाहीं इथें! तो बल्लव, लड्डुक, आणि तो खादाड पुंडलीक हे सगळे गेलें तरी कुठें ?

लड्डुक—(हलक्या स्वरानें) ती पाहिलीस पुंडलीकाची स्वारी; एका कोपऱ्यांत, पडद्याचे आडोशास फराळावर यथास्थित हात मारित बसली आहे !

बल्लव—( हलकेच लड्डुकास ) चप्प, जरा थांब. मीं खूण केल्याबरोबर तो पडदा बाजूला कर. ( उघड मोठ्यानें ) बल्लवतर बोलूनचालून म्हातारा, लड्डुकतर किडकिड्या आणि अशक्त. ते बसूनबसून कटाळून आडवे झाले असतील बिचारे ! पण तो पुंडलीक कुठें गेला? स्वारी बुटकी पण यथास्थित गुब्ब आणि गल्लेलठ्ठ आहे. खाऊनखाऊन आडवा माजला आहे. त्याच्यानें जागचें हालवायचेंसुद्धां नाहीं ! त्यांतून तो आळशी, खादाड, द्वाड, मुरदाड, झोंपाळू, हाताळू ! (एकीकडे लड्डुकास ह अशी खूण करितो तोंच लड्डुक पडदादूर करितो.) तोंडाळू—तोंडाळू असल्याचेंतर हें प्रत्यक्षच पहा. शिवाय वरती गालफुगाळू (त्याच्या गालावर बुक्क्या मारतो) आणि ओकाळूहि आहे! अरे पुंडलीका, आह्मी इथून गेल्यापासून फराळावर हात मारायला जी सुरुवात केलीस, तो अजून तुझा हात थांबला नाहीं वाटते ?

पुंडलीक—बाबांनों ! एखाद्याच्या पाठीवर मारावें, पण पोटावर मारूं नये ! पोटावर मारलेलेंदेखील एक वेळ पत्करेल, पण तुह्मी माझ्या तोंडांतला घांस देखील काढतां, तेव्हां तुह्मांला काय ह्मणावें ? तुह्मी गेल्यापासून इथें मला फराळ मागायला येणारांनी बेजार केलें! जो येई तो 'झटपट, झटपट' ह्मणत येई; भूक लागली ह्मणून नुकता कुठें फराळाला बसलों, तों तुमची तोंडाची, हाताची दुहेरीतिहेरी झटपट सुरू झाली !

( इतक्यांत दुःशासन येतो. )

दुःशासन—अरे कोण आहे इथें ! बल्लवा, लड्डुका, पुंडलिका! मला कुणी थोडें सरबत द्या पाहू झटपट.

पुंडलीक—ही पहा आणखी एक झटपट आली !

